

नोंदणी क्रं. एफ.१६०१४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष १९ वे ] जानेवारी १९६६ [ अंक ४



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.






प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचे मासिक

वर्ष एकोणीसावे | नवभारत | जानेवारी
अंक चवथा | | १९६६

( महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळ पुरस्कृत )
संपादक-मंडळ
प्रा. वि. म. बेडेकर—प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक



**वार्षिक रु. ९** **सहामाही रु. ५** **अंकास रु. १**

हे मासिक श्री. म. शं. साठे यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
'गणेश भुवन' २७६, तेलंग रोड, माटुंगा–मुंबई १९
२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( जि० सातारा )
३ चौकशी : श्री. वा. वि. कोनकर
१८८ एफ्, भीमरावबाडी, मुंबई २
फोन नं. ३५४८५४






अनुक्रमणिका








– किथ बुश

# क्रुश्चेव्हच्या पदच्युतीनंतर रशियात झालेल्या शेती-सुधारणा

[ Soviet Agricultural Reforms Since Khrushechev – Keith Buse ]

रशियन उद्योगधंदे बहुतेकवेळी बहुतेक उद्दिष्टे पुरी करतात परंतु तेथील शेतीचे एखादे उद्दिष्टसुद्धा कधी पूर्ण होणे कठिण असते. स्टालिनच्या काळातील निराशाजनक गर्तेतून क्रुश्चेव्हच्या अमदानीच्या प्रथम पाच वर्षात रशियन शेतीने भरदार प्रगती केली. पण त्याच्या कारकीर्दीच्या उत्तरार्धात मात्र ती पूर्णतः थंडावली. १९५८ ते १९६४ च्या दरम्यान निव्वळ शेती उत्पन्नात (एकूण उत्पादन न देण्याची खाशी युक्ती) जास्तीत जास्त ५ टक्के वाढ झाली तर त्याच काळात लोकसंख्येने मात्र ९·७ टक्के वाढ नोंदविली. फक्त दोन महत्त्वाची पिके– कपाशी आणि सुगरबीट त्यांचे सप्तवर्षीय लक्ष जेमतेम पूर्ण करू शकली. जाहीर केल्यापैकी कोणतेही लक्ष पूर्ण करताना एकूण रशियन शेतीस सतत येणाऱ्या अपयशामुळे केवळ सप्तवार्षिक योजनेची पूर्ती कचाट्यात सापडली आहे असे नाही तर १९८० च्या सुमारास "संपूर्ण साम्यवादा" चा पाया निर्मिण्याच्या प्रगतीलाच खो बसला आहे.

गेल्या ऑक्टोबरमध्ये नवीन नवीन नेत्यांनी सत्ता हस्तगत केली तेव्हा वरील परिस्थिती होती. पाच महिन्यानंतर ब्रेझनेव्हने रशियन अर्थव्यवस्थेच्या या दुखऱ्या भागावर करावयाच्या आपल्या उपचाराची रूपरेषा मांडली. (या बाबतीत क्रुश्चेव्हशी उल्लेखनीय साम्य आहे : स्टालिनच्या मृत्यूनंतर सहा महिन्यांनी, सप्टेंबर १९५३ मध्ये, क्रुश्चेव्हने आपल्या पूर्वाधिकाऱ्याच्या शेती धोरणाचे वाभाडे काढले आणि क्रांतिकारक पण वाजवी सुधारणा मांडल्या). रशियन शेतीच्या सध्याच्या समाजवादी रचनेचा त्याग केला नसला किंवा त्यात आमूलाग्र बदल केला नसला तरी ब्रेझनेव्हच्या सूचना सद्यःस्थितीत रशियन शेतकऱ्यांचे भाग्य कसे उजळेल आणि शेतीची नव्याने वाढ कशी होईल याचा विचार करणाऱ्या आहेत.

## सरकारी खरेदी-विक्रीची नवी उद्दिष्टे

**धान्य** :– खालील कोष्टकात १९६२–६४ मधील प्रत्यक्ष सरकारी खरेदी-विक्रीची (एक साधारण, एक अगदी वाईट व एक अगदी चांगले अशी तीन वर्षे) १९६५–७० मधील नियोजित उद्दिष्टांशी तुलना केली आहे :

(आकडे हजार मेट्रिक टनाचे)

| संघराज्याचे नाव | १९६२ | १९६३ | १९६४ | १९६५–७० |
|---|---|---|---|---|
| (१) आर एस् एफ् एस् आर | ३६,३२९ | २८,०१३ | ३८,९५६ | ३४,४७५ |
| (अ) वायव्य विभाग | ३८ | ११९ | — | — |
| (ब) मध्य विभाग | १,१५३ | १,२०५ | — | — |
| (क) व्होल्गा-व्याटका विभाग | ८५९ | ७७० | — | — |
| (२) युक्रेन | १०,६५० | ९,६६८ | ११,५११ | १०,११५ |
| (३) बेलोरशिया | २५७ | ३६२ | ३२७ | २५१ |
| (४) उझबेक | १६३ | ३०५ | ६३४ | २८७ |
| (५) कझाक | ८,२१५ | ४,७०९ | १५,४१५ | ९,६०७ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| (६) व्हर्जिन लँडस् क्राई | ५,२०० | २,१०० | ११,९०२ | ७,२६२ |
| (७) जॉर्जिया | ३४ | २०३ | ११० | ६७ |
| (८) अझरबैदझाव | १४१ | १५१ | १७१ | १३४ |
| (९) लिथुआनिया | १८ | १४२ | १२० | ७५ |
| (१०) मोल्डाव्हिया | ५८० | ६६० | ४७९ | ४०० |
| (११) लाटव्हिया | २१ | ११५ | १२२ | ६७ |
| (१२) किरगिझ | १५५ | २१७ | १९६ | १७० |
| (१३) ताडझिक | ३१ | ५८ | ६५ | ३० |
| (१४) आर्मेनिया | ३५ | ५३ | ४३ | २० |
| (१५) तुर्कमेन | ७ | २० | ४१ | २० |
| (१६) इस्टोनिया | १३ | ६६ | ६१ | ३० |
| यू. एस्. एस्. आर. | ५६,६४९ | ४४,८२२ | ६८,२५१ | ५५,७३८ |

स्टालिन आणि क्रुश्चेव्ह या दोघांच्याही कारकीर्दीत धान्याच्या सरकारी खरेदी-विक्रीची उद्दिष्टे अवास्तवरीत्या उंच ठेवली गेली. पक्षयंत्रणेतील मध्यवर्ती समितीच्या प्रथम चिटणिसापासून खालपर्यंत उद्दिष्टे पूर्ण करण्यासाठी सतत आलेल्या दडपणामुळे प्रत्येक वर्षी अधिकाधिक पीक काढण्याच्या प्रयत्नात पुढील वर्षांच्या पिकांकडे आणि एकूण शेतीवर होणाऱ्या दूरगामी परिणामांकडे दुर्लक्ष झाले. खत आणि बियाणाच्या अभावी शेते धुपून निघाली आणि शेतसारा (trudoden payments) काढून ठेवलेल्या धान्यावर वारंवार धाड पडू लागली. प्रत्येक स्थानिक पक्षाधिकाऱ्याच्या दृष्टीने चालू वर्ष महत्त्वाचे असे. पुढील वर्षांच्या किंवा आगामी दहा वर्षांच्या पिकांना काही धोका निर्माण झाला तरी तो दुर्लक्ष करू शके, कारण त्यावेळेपर्यंत तो अधिकारी दुसरीकडे बदलून जाई.

शिवाय सरकारी खरेदी–विक्रीच्या योजना वर्षावर्षाला किंवा एका वर्षातून अनेकदा बदलल्या जात. यामुळे बदलत्या पिकांच्या कोणत्याही चांगल्या पद्धतीचा बोजवारा उडत असे आणि भू–संरक्षणाची एखादी दूरगामी उपाययोजना हाती घेता येत नसे.

आपल्या साडेसातीला लागलेल्या या कमकुवतपणाची नव्या नेत्यांना जाणीव आहे. मार्चमध्ये ब्रेझनेव्हने जी उद्दिष्टे जाहीर केली आहेत ती साधारणतः १९६२ च्या प्रत्यक्ष सरकारी खरेदी–विक्रीच्या पातळीवर आहेत, आणि ती १९६५–७० या काळात स्थिर रहातील. यामुळे धान्य उत्पादकांना दूरगामी योजना आखता येतील (याउलट, १९७० साली सरकारला सुमारे ९०,२००,००० टन धान्य खरेदी करावे लागेल असे भविष्य क्रुश्चेव्हने केले होते). प्रत्येक संघराज्याची वैशिष्टये आणि पूर्वेतिहास व उत्तेजनार्थ सुरू करण्यात आलेल्या योजना आणि भांडवल गुंतवणुकीसाठी ब्रेझनेव्हने जाहीर केलेल्या फायदेशीर सवलती बघता १९६५ ते ७० साठी ठेवलेली उद्दिष्टे साध्य होण्यासारखी वाटतात. याला क्राईचा लागवडीखाली न आलेला प्रदेश आणि त्याबरोबर कझाकस्थान यांचा अपवाद आहे. नव्या जमिनी लागवडीखाली आणण्याच्या योजनेच्या विभागातील मध्यभागी असणाऱ्या या प्रदेशांतील सीमान्त जमिनीत दहा वर्षेपर्यंत एकाच प्रकारचे पीक काढले जात होते. त्यामुळे १९५८ ते १९६३ च्या दरम्यान एकूण उत्पादन एकदम घसरले. शिवाय १९६४ साली जे भरघोस पीक आले तसे फक्त पाच वर्षांतून एकदाच घडले. खनिज खते या जमिनीत मोठ्या प्रमाणावर वापरली असती तरी त्याचा फार थोडा, आणि कदाचित अपायकारकही, परिणाम झाला असता. (क्राईच्या निर्जन भागातील वार्षिक पर्जन्यमान १२ इंचाहूनही कमी आहे). मोठ्या प्रमाणावर पाणीपुरवठा करणेसुद्धा अशक्यच आहे. उत्पादन जर मोठ्या प्रमाणावर वाढवायचे असेल तर दरवर्षी ४० टक्के जमीन पडित ठेवणे आवश्यक आहे. परंतु १९६५–७० ची लक्ष्ये बघता वरील पद्धत योजनाकारांनी अवलंबिलेली नाही असे दिसते. त्यामुळे क्राईच्या निर्जन शेतीतील उद्दिष्टे पूर्ण होणे असंभवनीय आहे.

## गुरेढोरे व तज्जन्य वस्तू

गुरेढोरे व तज्जन्य वस्तूंच्या सरकारी खरेदी-विक्रीचे ब्रेझनेव्हने जाहीर केलेले प्रमाण बरेच मर्यादित असल्याने त्याच्या पूर्वाधिकाऱ्याच्या योजनांपेक्षा ते जास्त सहज साध्य आहे. उदाहरणार्थ, मांस आणि पोल्ट्रीचे १९७० चे नवे उद्दिष्ट १९६५ च्या नियंत्रित ११,१००,००० इष्टांकापेक्षा किंचित जास्त आहे. खालील कोष्टकात १९६०-७० या काळांतील इष्टांकांची १९६४ मधील सरकारी खरेदीच्या प्रत्यक्ष पातळीशी तुलना केली आहे:-

(आकडे हजार टनाचे)

| | १९६४ | '६५ | '६६ | '६७ | '६८ | '६९ | '७० |
|---|---|---|---|---|---|---|---|
| (१) जनावरे व पोल्ट्री (सजीव वजन) | ८,३०० | ८,५०० | ८,९०० | ९,५०० | १०,२०० | १०,७०० | ११,४०० |
| (२) दूध व दुधाचे पदार्थ | ३१,४०० | ३३,७०० | ३४,६०० | ३६,२०० | ३८,४०० | ४०,८०० | ४३,४०० |
| (३) अंडी (दशलक्ष) | ८,३०० | ९,४०० | १०,००० | १०,८०० | ११,९०० | १३,५०० | १५,००० |
| (४) लोकर (अकाउंटिंग वेट) | ३५२ | ३४८ | ३६१ | ३७३ | ३८७ | ४०७ | ४३० |

## किंमती

**गहूं व रायच्या सरकारी खरेदीच्या किंमती :-** ब्रेझनेव्हने जाहीर केलेल्या सामूहिक शेतीतील धान्याच्या सरकारी खरेदी किंमतीत बहुतेक भागात १२ टक्के वाढ झाली आहे. तर आर् एस् एफ् एस् आर्, बेलोरशिया आणि बाल्टिक संघराज्यांतील बिगर काळ्या जमिनीतील उत्पादनासाठी- जेथे ही पिके आतापर्यंत तोट्यात काढली जात- ५३ टक्के वाढ जाहीर केली आहे. खालील कोष्टकात जुन्या (१९६२) व नव्या किंमतींशी तुलना केली आहे (१९६३ च्या वाईट वर्षी किंमती निःसंशयरीत्या वाढल्या असल्या तरी १९६४ साली भरघोस पीक आल्याने परत उतरल्या. म्हणून तुलनेच्या दृष्टीने १९६२ साल सर्वात अधिक संयुक्तिक आहे) :-

(किंमती रूबल्स दर टनी)

| | गहू | | राय | |
|---|---|---|---|---|
| | जुनी | नवीन | जुनी | नवीन |
| (१) आर् एस् एफ् एस् आर् | ७७ | ८६ | ७६ | ८१ |
| (२) युक्रेन | ६७ | ७६ | ६४ | ७६ |
| (३) कझाक | ७१ | ८० | ६५ | ८० |
| (४) किरगिझ | ७६ | ८५ | ७२ | ८० |
| (५) उझबेक, जॉर्जिया | ८० | ९० | ७५ | ८५ |
| (६) उर्वरित आर् एस् एफ्एस् आर् | ८५ | १३० | ८५ | १३० |
| सर्व संघराज्याची सरासरी | ७४ | ८३ | ७५ | ९२ |

या सरासरी किंमतीत प्रत्येक संघराज्यांत मोठ्या प्रमाणावर असणाऱ्या प्रादेशिक फरकांचा समावेश होतो: उदाहरणार्थ, १९६१ साली आर एस् एफ् एस् आर मध्ये 'सॉफ्ट व्हीट' च्या किंमती पहिल्या विभागात दरटनी ६३ रूबल्सपासून सतराव्या विभागात दरटनी ८५ रूबल्सपर्यंत बदलल्या. सामान्यतः, सॉफ्ट-व्हीटच्या किंमतीवर ४० टक्के जादा किंमत देऊन हार्डव्हीट खरेदी केला जातो. हा व्यावर्तक कायम ठेवला जाईल की नाही हे मात्र ब्रेझनेव्हच्या भाषणावरून कळत नाही.

बदलत जाणाऱ्या किंमती नष्ट करण्याचे ठरले आहे. यासाठी रशियाकडून देण्यात येणारे एकमेव स्पष्टीकरण





अनुक्रमणिका

म्हणजे या किंमतीमुळे सामूहिक शेतांमधील उत्पादन आणि गुरांची उत्पादनक्षमता वाढण्यास उत्तेजन मिळत नाही आणि उत्पादनखर्चही कमी होत नाही. अर्थात यामागील प्रमुख हेतु असा आहे की उत्पन्न आणि खर्च यांचे नियोजन अधिक स्थिर होईल. वृत्तपत्रीय अहवाल पाहिले तर या किंमतपद्धतीचा स्थानिक अधिकाऱ्यांनी गैरवापर केला असे आणखी एक स्पष्टीकरण मिळते.

योजनेव्यतिरिक्त जी सरकारी खरेदी होते त्यासाठी मूळ किंमतींच्या ५० टक्के वाढीच्या स्वरूपात उत्तेजन दिले जाते.

संपूर्ण संघराज्यासाठी असणारी सरकारी खरेदीची गव्हाची मूळ किंमत दरटनी ८३ रूबल्स आहे तर रायची किंमत दरटनी ९२ रूबल्स आहे. १९६०–६२ काळांतील सामूहिक शेतीवरील धान्य उत्पादनाचा (corn वगळून) सरासरी खर्च दरटनी ४० रूबल्स होता.

**गहू व रायच्या सरकारी विक्रीच्या किमती :–** आतापर्यंत सरकारी शेतीवरील धान्यास सामूहिक शेतीवरील धान्यापेक्षा फार कमी किमती दिल्या जात. नवीन किमती कोष्टकांप्रमाणे हा फरक बराच कमी करण्यात आला आहे. एका गटातील सर्व किमती सारख्याच ठेवल्या जातात. सामूहिक शेतांप्रमाणेच सरकारी शेतांनासुद्धा योजनेव्यतिरिक्त येणाऱ्या मालावर ५० टक्के प्रिमियम मिळणार आहे. पुढील कोष्टकात नव्या किमतींची १९६१ मधील सरासरी किमतींशी तुलना केली आहे :

**(किंमती रूबल्स दर टनी)**

| | गहू | | राय | |
|---|---|---|---|---|
| | जुनी | नवीन | जुनी | नवीन |
| (१) आर् एस् एफ् एस् आर् | ३० | ५९ | २५ | ६३ |
| (२) युक्रेन व मोल्डाव्हिया | ३४ | ४५ | २८ | ४५ |
| (३) कझाख | ४७ | ६५ | ४५ | ६० |
| (४) किरगिझ | ४७ | ६५ | ४१ | ६० |
| (५) उझबेक, जॉर्जिया वगैरे | ४८ | ९० | ४० | ६० |
| (६) उर्वरित आर एस् एफ् एस् आर | ६८ | १३० | ६० | ८५<br>१३० |
| सर्व संघराज्याची सरासरी | ४८ | ६० | ५७ | ७५ |

**बकव्हीट, कडधान्ये व तांदूळ :–** सर्व सामूहिक व सरकारी शेतांना त्यांचे भौगोलिक स्थान लक्षात न घेता या पिकांसाठी सर्वसाधारण किंमती खालीलप्रमाणे दिल्या जातील :–

**(किंमती रूबल्स दर टनी)**

| | जुनी किंमत | नवी किंमत |
|---|---|---|
| (१) बकव्हीट | २०० | ३०० |
| (२) कडधान्य (सर्वोत्तम प्रकार) | ८० | ११० |
| (३) तांदूळ | २२० | ३०० |

### बार्ली व ओट :

या पिकांसाठी दिल्या जाणाऱ्या किमती १९६१ पेक्षा वाढलेल्या आहेत. आर् एस् एफ् एस् आर् चे वायव्य, मध्य व व्होल्गा-व्याटका विभाग, कॅलिनिनग्राड व पर्म ओब्लास्टस्, अडमर्ट संघराज्य, बेलोरशियन व बाल्टिक संघराज्ये आणि युक्रेनचा पोळेसी विभाग, या प्रदेशातील सामूहिक व सरकारी शेतांसाठी या वाढीव किंमती पुढीलप्रमाणे आहेत :–










( किंमती रूबल्स दर टनी )

| | जुनी किंमत | नवी किंमत |
|---|---|---|
| बार्ली ( वैरण ) : | | |
| सामूहिक शेतांपासून | ४०-७९ | ९० |
| सरकारी ,, | २३-५५ | ९० |
| ओट : | | |
| सामूहिक शेतांपासून | ३८-६५ | ७५ |
| सरकारी ,, | १४-३६ | ७५ |

## गुरेढोरे

१९६२ मध्ये क्रुश्चेव्हने गुरे व लोण्याच्या किंमतीत सर्वसाधारण ३५ टक्के वाढ जाहीर केली. किंमतीत एवढी वाढ होऊनही जनावरांची निपज हा तोट्यात चालणारा धंदा आहे हे स्पष्ट आहे. आणि म्हणूनच मध्यवर्ती समितीच्या मार्चच्या बैठकीसमोरील भाषणात किमतीमध्ये आणखी वाढ जाहीर केली. संघराज्यवार आणि विभागवार फरक असले तरी आर् एस् एफ् एस् आर् मधील सरासरी किंमतींवरून वाढीच्या सर्वसाधारण परिणामांची कल्पना येते. (खालील कोष्टकातील सरकारी खरेदीच्या किंमती १९६२ मधील आहेत व सरकारी विक्रीच्या किंमती १९६१ च्या आहेत) :–

[ किंमती रूबल्स दर टनी ]

| | जुनी किंमत | वाढ (टक्के) | नवी किंमत |
|---|---|---|---|
| (१) गुरेंढोरें ( Cattle ) : | | | |
| – सामूहिक शेतांतून | ९०० | २०-५५ | १०८०-१३९५ |
| – सरकारी ,, | ८१० | १४-३३ | ९२३-१०७७ |
| (२) डुकरें ( Bacon Hogs ) : | | | |
| – सामूहिक शेतांतून | १२५० | ३०-७० | १६२५-२१२५ |
| – सरकारी ,, | ११२० | १४-३३ | १२७७-१४९० |
| (३) मेंढ्या ( Sheep ) : | | | |
| – सामूहिक शेतातून | ५३० | १०-७० | ५८३-९०१ |
| – सरकारी ,, | ५३० | १४-३३ | ६०४-७०५ |

शेळ्यांच्या किमतीत मेंढ्यांच्या किमतीत झालेल्या वाढीइतकीच वाढ केली जाईल. आर्एस्एफ्एस्आर् मधील डोंगराळ प्रदेश, युक्रेन, जॉर्जिया, अझरबैदझन, किरगिझ व ताडझिक संघराज्यातील शेळ्या-मेंढ्यांच्या सध्याच्या किमतीमध्ये १०० टक्के वाढ केली जाईल. कॅलिनिनग्राड, पर्म ओब्लास्टस्, अडमर्ट, आर्एस्-एफ्एस्आर् मधील वायव्य, मध्य व व्होल्गा-व्याटका हे प्रदेश आणि युक्रेनच्या पोलेसी भागात सर्व शेतांवरील शेळ्या– मेंढ्यांच्या सरकारी खरेदी किमतीत ७० टक्के वाढ होईल.

ही किंमतवाढी जाहीर होण्यापूर्वीच मांसावरील संस्करणधंद्यास खरेदी आणि किरकोळ किंमतीतील फरक भरून काढण्यासाठी अंदाजपत्रकात अनुदान देण्याची तरतूद केली होती. किरकोळ किंमती कायम ठेवावयाच्या असल्याने ह्या सरकारी मदतीत बरीच वाढ करणे भाग आहे. खरेदी व किरकोळ किमतीतील फरकाची कल्पना पुढील कोष्टकावरून येऊ शकेल. या किंमती आर्एस्एफ्एस्आर् मधील सरासरी खरेदी किमतीवर (वर दिलेल्या) आधारित असून त्यांत वाहतुक, संस्करण व वितरण खर्चाचा विचार केलेला नाही:–



अनुक्रमणिका






(किंमती रुबल्स दर किलोग्रॅममागे)

| | खरेदी किंमत (सजीव किंमत) | निर्जीव वजन समाजीक | किरकोळ किंमत |
|---|---|---|---|
| (१) गुरेढोरे (Cattle) | | | |
| – सामूहिक शेतातून | १·०८–१·४० | २·१६–२·८० | १·०६–२·०० |
| – सरकारी ,, | ०·९३–१·०८ | १·८४–२·१६ | १·०६–२·०० |
| (२) डुकरे (Bacon Hogs) | | | |
| – सामूहिक शेतातून | १·६३–२·१३ | २·१७–२·८४ | १·९०–४·२० |
| – सरकारी ,, | १·२८–१·४९ | १·७१–१·९९ | १·९०–४·२० |
| (३) मेंढ्या (Sheep) | | | |
| – सामूहिक शेतातून | ०·५८–०·९० | १·१६-१·८० | ०·४५–१·९० |
| – सरकारी ,, | ०·६०-०·७० | १·२०-१·४० | ०·४५–१·९० |

**दूध व क्रीमः**– ताजे दूध मिळवणे सोपे नसते हे रशियातील शहरी भागातील जवळपासच्या प्रत्येक गृहिणीला माहित आहे. याचे महत्त्वाचे कारण म्हणजे दुधाच्या सरकारी खरेदी–विक्रीच्या निरुत्साहजनक अशा अत्यंत कमी किमती हे होय. उदाहरणार्थ, १९६३ मध्ये दुधाची सरकारी खरेदी किंमत दर लिटरमागे ८ कोपेक होती तर उत्पादनखर्च बाश्किरियामध्ये १४·७ कोपेक व मॉस्को ओब्लास्टमध्ये १९ कोपेक होता. क्रुश्चेव्हच्या पदच्युतीनंतर ज्या सरकारी खरेदी–विक्री किंमतीत वाढ जाहीर करण्यात आली त्यापैकी दूध एक होते. गार्बूझोव्हने सुप्रीम सोव्हिएटपुढे ९ डिसेंबर १९६४ रोजी केलेल्या भाषणामध्ये हे जाहीर केले गेले. त्याचा तपशील नंतर देण्यात आला. त्याप्रमाणे वेगवेगळ्या किंमती आर्एस्एफ्एस्आर्च्या १२ आणि कझाक संघराज्याच्या २ विभागात अमलात येतील. इतर संघराज्यात मात्र असे किंमत विभाग केले जाणार नाहीत. खालील कोष्टकात सामूहिक व सरकारी अशा दोन्ही शेतांसाठी असणाऱ्या नव्या किंमती दिल्या आहेत :—

| | दूध (रुबल्स दर टन) | क्रिम १०% चरबी अंश (कोपेक दर किलोग्रॅम) |
|---|---|---|
| (१) आर् एस् एफ् एस् आर् | १३० –२३० | २७–४७ |
| (२) कझाक | १५४·५–१८० | ३२–३८ |
| (३) बेलोरशिया व बाल्टिक | १६० | ३६ |
| (४) इतर संघराज्यें | १५५ | ३२ |

१९६५ साली दूध व क्रीम यांच्या सरकारी खरेदी–विक्री किंमतीमध्ये जी वाढ करण्यात आली आहे तिचा जादा खर्च ५०० दशलक्ष रूबल्सहूनही अधिक होईल.

२ जानेवारी १९६५ पासून डेअरीज व सेपरेटिंग प्लँट्स (Separating plants) याकडून दुग्धोत्पादकाकडे परत येणाऱ्या मलई विरहित (Skimmed milk) दुधाची किंमत दर टनामागे ३० रूबल्सपर्यंत एकसारखी वाढविण्यात आली. पण १ मे १९६५ पासून परत ही किंमत दर टनामागे १० रूबल्सपर्यंत कमी करण्यात आली आहे. सरकारी खरेदीच्या दुधातील चरबी–अंशाची अट ढिली करण्यात आली असून हे प्रमाण आर् एस् एफ् एस् आर् मध्ये ३·७ टक्के, युक्रेन व जॉर्जियामध्ये ३·६ टक्के, मोल्डाव्हियामध्ये ३·५ टक्के आणि लिथुआनियामध्ये ३·४ टक्के

आहे. यामुळे शेताचे उत्पन्न वाढण्यास मदत होईल. कारण पूर्वी नेमून दिलेल्या चरबीप्रमाणापेक्षा कमी प्रतीचे दूध असल्यास दंड केला जात असे.

## १९६५ सालाचा किंमतवाढीचा एकूण खर्च:-

रशियातून आलेल्या एका माहितीनुसार गहू व रायच्या सरकारी खरेदी-विक्रीच्या वाढीव किंमतींचा खर्च ७६४ दशलक्ष रूबल्स एवढा होतो. हा अंदाज बराच रास्त वाटतो. १९६५ मध्ये बकव्हीट, कडधान्ये, तांदूळ, बार्ली व ओट यांच्या अपेक्षित खरेदीवर होणारा वाढीव खर्च १०० दशलक्ष रूबल्सवर जाणार नाही असा अंदाज आहे. १९६५ सालच्या अंदाजपत्रकाचा अहवाल सादर करताना गार्बूझोव्हने दुधाच्या सरकारी खरेदी-विक्री किंमतीमधील वाढीसाठी ७२८ दशलक्ष रूबल्सची तरतूद असल्याचे जाहीर केले. दुसऱ्या एका सोव्हिएट Source नुसार हा आंकडा ५०० दशलक्ष रूबल्सवर जातो. मांसाच्या किंमतीमधील वाढ १ मे १९६५ पासून अमलात आली आहे हे लक्षात घेता एकूण जादा खर्च १३०० ते २००० दशलक्ष रूबल्सच्या दरम्यान होईल असा अंदाज करण्यास हरकत नाही. योजनेव्यतिरिक्त जी धान्यखरेदी करावयाची आहे त्याबद्दल असे म्हणता येईल की सरकारला ५५,७००,००० टनाच्या नियोजित उद्दिष्टापेक्षा बरेच अधिक धान्य खरेदी करावे लागेल. ब्रेझनेव्हच्या मते मुक्रर केलेला धान्यसाठा देशाची वाढती गरज आणि सरकारी राखीव साठ्याची गरज भागवू शकणार नाही. नेमके किती धान्य जादा खरेदी करावे लागेल हे सांगणे कठीण आहे. परन्तु रशियाने जर पूर्वयुरोप व क्यूबास मर्यादित स्वरूपात धान्य निर्यात करण्याचे परत सुरू केले तर जादा धान्य खरेदीची गरज सुमारे ७ दशलक्ष टनाइतकी होईल असे रास्तपणे मानता येईल. हे धान्य ५० टक्के जादा रक्कम देऊन खरीदावे लागेल आणि त्यासाठी सरकारला २७५ दशलक्ष रूबल्स जादा खर्च येईल.

म्हणजे, नवीन खरेदी किंमतीमुळे १९६५ साली होणारा जादा सरकारी खर्च २६०० ते ३६०० दशलक्ष रूबल्सच्या दरम्यान असेल. जर नियोजित उद्दिष्टांपेक्षा जादा धान्यखरेदी ७ दशलक्ष टनापर्यंत गेली तर हाच जादा खर्च २९०० ते ३९०० दशलक्ष रूबल्सपर्यंत जाईल.

## भांडवल गुंतवणूक*

आगामी पाच वर्षांसाठी शेतीतील नियोजित गुंतवणूक जाहीर करताना ब्रेझनेव्ह म्हणाला :

*** शेतीतील भांडवल गुंतवणूक, प्रत्यक्ष किंवा नियोजित : १९५९-६५ व १९६६-७० ( रूबल्स : १९५९-६४ ची माहिती १९५५ च्या रूबलसप्रमाणे १९६५-७० ची माहिती चालू किंमतीप्रमाणे. कोष्टकांतील आकडे दशलक्ष रूबल्सचे ).**

| | सरकारी | सामूहिक शेते | एकूण |
|---|---|---|---|
| १९५९ | २४९५ | ३,५२६ | ६,०२१ |
| १९६० | ३,०६१ | ३,१६६ | ६,२२७ |
| १९६१ | ३,७२७ | ३,१५५ | ६,८८२ |
| १९६२ | ४,१५८ | ३,२७४ | ७,४३२ |
| १९६३ | ४,७९७ | ३,४१६ | ८,२१३ |
| १९६४ | ६,१०० | ४,००० | १०,१०० |
| १९६५ | ५,७०० | ५,००० | १०,७०० |
| १९५९–५६ | ३०,००० | २५,५०० | ५५,५०० |
| १९६६–७० | ४४,००० | ३०,००० | ७१,००० |

"येत्या पंचवार्षिक योजनेच्या काळात ७१००० दशलक्ष रूबल्स सरकारी व सामूहिक शेतांमध्ये गुंतविण्याचे ठरले आहे. शेतावरील इमारती उभारण्यासाठी आणि यंत्रसामुग्री घेण्यासाठी ४१००० दशलक्ष रूबल्स इतकी सरकारी भांडवल गुंतवणूक होईल. यासाठी २१००० दशलक्ष रूबल्स बांधकाम व फिटिंगसाठी खर्च होतील."

या गुंतवणुकीसाठी सामूहिक शेतांकडून ३०,००० दशलक्ष रूबल्सची अपेक्षा असल्याच्या वृत्तास नंतर दुजोरा मिळाला. या प्रयत्नात सामूहिक शेतांना मोठ्या प्रमाणावर सरकारी कर्जे दिली जातील.

हे आकडे डोळयात भरण्यासारखे असले तरी चालू सप्तवर्षीय योजनेच्या शेतीतील ५५,००० दशलक्ष रूबल्सच्या गुंतवणुकीच्या मानाने फारसे आश्चर्यकारक नाहीत. खरे म्हणजे गेल्या सहा वर्षातील शेती-गुंतवणुकीतील वाढीपेक्षा योजनेतील सरासरी वार्षिक वाढ फार थोड्या टक्क्यांनी जास्त आहे.

शेती विभागाला दिल्या गेलेल्या प्राधान्यावरून १९६५ सालच्या शेतीतील गुंतवणुकीसंबंधी असे म्हणता येईल की प्रत्यक्ष गुंतवणूक वरील कोष्टकापेक्षा बरीच जास्त होईल. टेरेन्टेव्हने एका नियतकालिकात वर्तविल्याप्रमाणे शेतीतील एकूण गुंतवणुकीचा आकडा १९६५ साली १२,८०० रूबल्सपर्यंत जाईल.

## अन्य प्रकारची भांडवल गुंतवणूक

**यंत्रसामुग्री:**– आगामी पंचवार्षिक शेतीसाठी दिल्या जाणाऱ्या यंत्रसामुग्रीचे प्रमाण पुढीलप्रमाणे आहे :–

"ट्रॅक्टर्सच्या उत्पादनात बऱ्याच वाढीची अपेक्षा आहे. यामुळे पंचवार्षिक योजनेच्या अखेरीस वार्षिक उत्पादन ६२५००० ट्रॅक्टर्सपर्यंत जाईल आणि पाच वर्षे मिळून शेतीस– नांगरण्याचे ७८०,००० धरून– १,७९०,००० ट्रॅक्टर्स पुरविले जातील व शेतीच्या यंत्रसामुग्रीची किंमत १०७०० दशलक्ष रूबल्सइतकी होईल. ग्रेन कंबाईन्सचे ( grain combines ) उत्पादन दरवर्षी ८४,००० पासून १२५,००० पर्यंत वाढेल. मागील ५ वर्षांत ३९४,००० मोटारी-वाहने पुरविली गेली तर येत्या पाच वर्षांत ही संख्या १,१००,००० पर्यंत जाईल."

**वाहने निकामी होण्याचा सर्वसाधारण वेग :** १२.५ टक्के ट्रॅक्टर्सच्या व ग्रेन कंबाईन्सच्या बाबतीत आणि १० टक्के ट्रक्सच्या बाबतीत जर कायम राहिला तर १९७० च्या अखेरीस रशियन कृषि-यंत्रसामुग्रीच्या काफिल्यात सुमारे २५००,००० ट्रॅक्टर्स, ७००,००० ग्रेन कंबाईन्स व १६००,००० ट्रक्स असतील. याबाबतीत अमेरिकेशी तुलना करणे उद्बोधक ठरेल:– १९६२ च्या अखेरीस अमेरिकन शेतांवर ५१७०,००० ट्रॅक्टर्स, १०२०,००० ग्रेन कंबाईन्स आणि २९००,००० ट्रक्स होत्या. तरी अमेरिकेची लागवडीखालील जमीन रशियन लागवडीखालील जमिनीच्या ६० टक्क्याहून कमी आहे.

## जलव्यवस्था व जमीनसुधारणा

येत्या पंचवार्षिक योजनेत ३ दशलक्ष हेक्टर्सपेक्षा जास्त प्रदेशासाठी पाणीपुरवठा हाती घेण्यात येईल. यासाठी होणाऱ्या खर्चाची कल्पना ब्रेझनेव्हच्या निवेदनावरून येऊ शकते. गेल्या २० वर्षांत जलसिंचन क्षेत्रात २३,००,००० हेक्टर्सनी वाढ झाली. दुसऱ्या एका अंदाजाप्रमाणे ( source ) गेल्या १० वर्षांत पाणी-पुरवठा कामासाठी ३०० दशलक्ष रूबल्सची गुंतवणूक केली गेली. गेल्या २० वर्षांत पाण्याचा निचरा करण्याचे जेवढे काम झाले–६ दशलक्ष हेक्टर्स– तेवढे येत्या योजनेमध्ये होणार आहे.

या एप्रिलमध्ये पक्षाच्या मध्यवर्ती समितीने आणि मंत्रीमंडळाने घेतलेल्या एका निर्णयाप्रमाणे सामूहिक शेतांवर "मूलभूत सुधारणांसाठी" होणारा खर्च सरकार सोसणार आहे.

## सामुदायिक शेते

पूर्वीच्या पद्धतीप्रमाणे सामूहिक शेतांवर सर्व रोकड आणि उत्पादित वस्तूंच्या किंमतीवर १२.५ टक्के या ठराविक दराने आय कर आकारला जाई. मात्र यातून काही पैसा रोकड आणि उत्पादक कारणांसाठी ( productive purposes) पुनश्च वापरल्या जाणाऱ्या वस्तूंना काही प्रमाणात सूट मिळे. १९५९–६३ च्या दरम्यान हा कर आरएसएफएसआर मधील सर्व सामूहिक शेतावरील एकूण उत्पादनाच्या ८.६ टक्के या प्रमाणात आकारला गेला. सामूहिक शेतावरील ठोक उत्पन्नावर कर आकारल्याने होणारा अन्याय लक्षात घेऊन यापुढे हा कर निव्वळ उत्पन्नावर आकारला जाईल असे आश्वासन ब्रेझनेव्हने दिले. नव्या तरतुदीचे सर्वात सोपे स्पष्टीकरण दुय्यम अर्थमंत्री एफ्. मॅनोइलोने दिले आहे.





अनुक्रमणिका

# क्रुश्चेव्हच्या पदच्युतीनंतर रशियात झालेल्या शेती-सुधारणा

१ जानेवारी १९६५ पासून सामूहिक शेतीतील ज्या विभागात निवळ उत्पन्न उत्पादनखर्चाच्या १५ टक्क्याहून जास्त असेल अशा भागावर १२ टक्के या ठरीव दराने हा कर आकारला जाईल. मॅनोइलोच्या उदाहरणाप्रमाणे एका सामूहिक शेतास बाजारात गेलेल्या उत्पादित वस्तूंवर १,२००,००० रूबल्स अधिक सेवेचा मोबदला म्हणून ७०,००० रूबल्स मिळतात. याशिवाय वस्तूरूपात १,३०,००० रूबल्सचे वितरण होते. या तिन्ही रकमातून १,०००,००० रूबल्सइतका एकूण उत्पादनखर्च वजा केला तर निवळ उत्पन्न ४००,००० रूबल्स रहाते. यापैकीं १५०,००० रूबल्स, म्हणजे उत्पादन-खर्चाच्या १५ टक्के, इतक्या रकमेवर सूट मिळते. उर्वरित करपात्र उत्पन्नावर १२ टक्क्यांनी कर आकारला जातो व त्यापासून ३०,००० रूबल्सइतका कर मिळतो.

दरमहा ६० रूबल्सइतका पगार करमुक्त असतो. याप्रमाणात वेतननिधीतील ( wages fund ) करमुक्त भागाव्यतिरिक्त रकमेवर आठ टक्के कर आकारला जातो.

जर शेतसारापद्धत ( trudoden system of Payments ) कायम रहाणार असेल तर उत्पादन खर्च कसा काढायचा याचा खुलासा मात्र मॅनोइलो करीत नाही. नव्या पद्धतीमुळे एकूण आयकर उत्पन्न १००० दशलक्ष रूबल्स वरून ५०० दशलक्ष रूबल्सइतके कमी होईल.

फक्त केवळ एकवेळ करावयाचा उपाय म्हणून स्टेट बँकेला आर्थिकदृष्ट्या कमकुवत असणाऱ्या सामूहिक शेतांच्या सरकारी कर्जासाठी २०१० दशलक्ष रूबल्स-पर्यंत हमी देण्याचा अधिकार आहे. यात १४५० दशलक्ष रूबल्सच्या दीर्घमुदतीच्या आणि ५६० दशलक्ष रूबल्सच्या लघुमुदतीच्या कर्जांचा ( पूर्वी स्थगित केलेली ) समावेश होतो. याच अधिकारान्वये सरकारी खरेदी संघटनांकडून करारावर मिळणाऱ्या पैशाच्या उचलीची परत फेडीची १२० दशलक्ष रूबल्सपर्यंतची रक्कम स्थगित ठेवता येते. ही स्थगित केलेली कर्जे मात्र १९७०–७५ मधील पाच वर्षात निकालात निघाली पाहिजेत. पुढील १२० दशलक्ष रूबल्सचे कर्ज रद्द केले जाते. हे कर्ज म्हणजे एम् टी एस् व आर् टी एस् ( MTS & RTS ) विसर्जित केल्यानंतर सामूहिक शेतांनी अवजारे, सवलती आणि यंत्रसामुग्रीच्या स्वरूपात ठेवलेली थकबाकी होय.

ज्यांची जमीन सरकारी शेते आणि सरकारी उद्योग-धंदे व संघटनांकडे गेली आहे अशा पूर्वीच्या सामूहिक शेतकऱ्यांना ( यात मच्छिमारी व्यवसाय करणारांचाही समावेश होतो ) १ जून १९६५ पासून वृद्धत्व व दुर्बलता पेन्शन मिळेल. हे पेन्शन १७ आक्टोबर १९६४ ( डिक्री नं. ८५९ ) रोजी मंत्रीमंडळाने मान्य केलेल्या सामूहिक-शेतकरी-पेन्शन कायद्याच्या नियमांप्रमाणे दिले जाईल.

१९६५ मध्ये सामूहिक शेतांना ७००० दशलक्ष रूबल्सपेक्षा जास्त सरकारी कर्जे. १९६४ साली त्यांना एकूण ४७०६ दशलक्ष रूबल्सची कर्जे मिळाली. ही रक्कम त्या वर्षीच्या उत्पादक खर्चाच्या ३८ टक्के आहे. त्यांचा वर्षाच्या पहिल्या सहा महिन्यांच्या खर्चाचा ८० टक्के भाग सरकारी कर्जांनी भरून निघतो. महत्वाच्या बांधकामासाठी दिल्या जाणाऱ्या कर्जाच्या परत फेडीची मुदत १५ ते २० वर्षे असते व त्यावर दरसाल ०·७५ टक्के व्याज आकारले जाते. अवजारे खरेदी करण्यासाठी दिलेल्या कर्जाच्या परतफेडीची मुदत ५ ते ८ वर्षे असते.

सप्तवार्षिक योजनेच्या पहिल्या सहा वर्षात सरकारी शेतीत रूपांतर झाल्याने व एकत्रीकरणामुळे सामूहिक शेतांची संख्या निम्म्यावर आली ( १९५८ च्या अखेरीस ६७,६८१ व १९६४ च्या अखेरीस ३७,६१८ ). त्याच काळात सरकारी शेतांची संख्या ६००२ पासून १००७५ पर्यंत गेली म्हणजे त्यात ६८ टक्क्यांनी वाढ झाली. हा प्रकार कमी करणे किंवा पूर्णपणे थांबविणे आवश्यक आहे हे ब्रेझनेव्हने स्पष्ट केले. "सध्याच्या काळात शेतांचे एका प्रकाराचे दुसऱ्या प्रकारात रुपांतर करण्याच्या पद्धतीस उत्तेजन देणे योग्य ठरणार नाही. उलट सामुदायिक शेतीच्या दोन्ही प्रकारांची प्रत्येक मार्गाने वाढ आणि भरभराट कशी होईल हे आपण पाहिले पाहिजे." आवाढव्य शेतांबद्दल आपल्याला असणाऱ्या प्रेमाचा क्रुश्चेव्हकडून नेहमी अतिरेक होत असे, एका ठिकाणी दलदल, जंगले, खराब रस्ते आणि इतर अडचणींमुळे एकमेकांपासून दूर असणारी १३८ खेडी एका सामूहिक






शेतात एकत्र केली गेली होती. ब्रेझनेव्ह म्हणतो त्याप्रणे काही शेते इतकी अवाढव्य केली गेली की त्यांची देखभाल करणे अशक्य झाले. सामूहिक शेताच्या पर्याप्त आकाराविषयी ( optimum size ) करण्यात आलेल्या चतुर्वार्षिक अहवालाचे निष्कर्ष नुकतेच जाहीर करण्यात आले. या आणि इतर अहवालांचे मथितार्थ पचविल्यानंतर अवाढव्य शेतांचे अधिक सुकर अशा तुकड्यांमध्ये विभाजन होईल अशी अपेक्षा करावयास हरकत नाही.

## सरकारी शेते

अगदी आतापर्यंत सरकारी शेतांवर काम करणाऱ्या अधिकाऱ्यांची त्यांच्या पगार-पद्धतीबद्दल वाजवी तक्रार होती. या पद्धतीमुळे कृषितज्ञ, इंजिनिअर्स आणि पशुवैद्यांच्या मूळ पगारात वार्षिक उत्पादनाचे लक्ष पुरे झाले नाही तर ३० टक्यांपर्यंत कपात होई–मग योजनेच्या अपयशाचे कारण वाईट हवा हे असले तरी ते कोणी लक्षात घेत नसे. ह्या परिस्थितीत आता सुधारणा झाली आहे. एका हुकुमान्वये सरकारी शेते, कृषि-विषयक धंदे आणि सरकारी शेती ट्रस्ट्सवर काम करणारा व्यवस्थापकवर्ग आणि तज्ञ यांना त्यांचे संपूर्ण वेतन किंवा पूर्ण मूळ पगार प्रत्येक महिन्यास मिळेल. तसेच नियोजित उद्दिष्टांपेक्षा जास्त उत्पादन करणाऱ्या अधिकाऱ्यांना आणि तज्ञांना वाढीव उत्पादनाच्या प्रत्येक टक्क्यावर वार्षिक वेतनाच्या किंवा मूळ पगाराच्या ०·३ टक्के जादा पैसे देण्याची तरतूद कायम ठेवण्यात आली आहे. हा गोंडस कायदा पुढे असे आश्वासन देतो की व्यवस्थापकवर्ग आणि तज्ञांना "नियोजित वार्षिक उद्दिष्टापेक्षा जास्त होणाऱ्या विक्रीवर दर टक्यास वेतनाच्या किंवा मूळ पगाराच्या १० टक्के बोनस मिळेल. हाच फायदा शेतमालाच्या नियोजित उद्दिष्टापेक्षा जास्त उत्पादन केल्यास गुरांची निपज करणाऱ्या किंवा शेतीच्या ( इतर ) विभागात काम करणारांनाही मिळेल."

नफा आणि खर्चातील घट यांच्याशी निगडित केलेले इतरही बोनस दिले जातात.

१९१९ साली सरकारी शेते अस्तित्वात आल्या-पासून, १९५६ साल सोडले तर, त्यांनी सतत तोटा सोसला आहे. १९६२ साली ७० टक्के सरकारी शेते तोट्यात चालत होती. व त्यासाठी ३००० दशलक्ष रूबल्सची अनुदाने द्यावी लागली. १९६४ मध्ये सर्व धान्यांचे भरघोस पीक येऊनसुद्धा सरकारी शेतांना ७६४ दशलक्ष रूबल्सचा तोटा आला.

हा प्रकार थांबलाच पाहिजे असा ब्रेझनेव्हचा निर्धार आहे: "सरकारी शेतांना येणाऱ्या तोट्याच्या भरपाईची जबाबदारी सरकारवर टाकली जाते. खर्च ताळेबंदाचे नियम केवळ सरकार आणि सरकारी शेतां-मधील आर्थिक संबंधाबाबतच धुडकावले गेले आहेत असे नाही तर सामूहिक शेतांबाबतही तेच घडले आहे. आपण भांडवलगुंतवणुकीचे वितरण व सरकारी शेतांना दिली जाणारी अनुदाने ठरीव ठशाच्या चौकटीत बसविण्याचा जो हव्यास धरतो त्या वृत्तीचा त्याग केला पाहिजे."

असा निर्धार प्रथमच व्यक्त होत आहे असे नाही; पण नव्या नेत्यांनी सरकारी शेतांची मजबूत आर्थिक पायावर उभारणी होण्यासाठी आवश्यक असणाऱ्या अनेक गोष्टी केल्या आहेत. नफ्याचा ४२ टक्के भाग स्वतःकडे ठेवण्याची या शेतांना परवानगी देण्यात आली आहे. जाहीर केलेल्या इतर उत्तेजनांव्यतिरिक्त नुसत्या नव्या खरेदी किंमतींमुळे १९६५ साली त्यांच्या उत्पन्नात २००० दशलक्ष रूबल्सची जादा भर पडेल. उदाहरणार्थ क्राईच्या ( krai ) ज्या निर्जन शेतांनी १९६४ च्या उच्चांकवर्षीसुद्धा मोठा तोटा सोसला त्याच शेतांमध्ये यावर्षी १०० दशलक्ष रूबल्सहून अधिक नफा मिळेल अशी अपेक्षा आहे.

## खाजगी विभाग

नव्या नेत्यांनी पहिली जर कोणती गोष्ट केली असेल तर ती म्हणजे खाजगी शेताच्या आकारमानावर आणि गुराढोरांच्या खाजगी मालकीवर जी निरर्थक बंधने होती ती उठवली. शिवाय नागरी विभागात गुरेढोरे पाळणाऱ्या खाजगी मालकांवर असणारा करही दूर केला.

अगदी लहान खाजगी शेते रशियाच्या एकूण लागवडीयोग्य जमिनीच्या फक्त ३ टक्के प्रदेश व्यापतात, पण गुराढोरांच्या खाजगी मालकीच्या साहाय्याने त्यांचे एकूण उत्पादन एकूण शेतमालाच्या एकतृतीयांश भरते तर बाजारात पाठवला जाणारा



अनुक्रमणिका






माल एकषष्ठांश आहे. तात्त्विकदृष्ट्या ही शेते कायम ठेवणे आक्षेपार्ह असू शकेल पण आर्थिकदृष्ट्या ती चालू राहणे अत्यावश्यक आहे.

८ डिसेंबर १९६४ रोजी मंत्रीमंडळाने एका निर्णयान्वये स्टेट बँकेस सामूहिक शेतीवरील शेतकरी; ग्रामीण विभाग, शहरे व उपनगरे यात रहाणारे कामगार आणि नोकर याना गाई आणि कालवडी खरीदण्यासाठी कर्जे मंजूर करण्याचा अधिकार दिला. प्रत्येक कुटुंबास गाई खरीदण्यासाठी ३०० रूबल्सपर्यंत व कालवडी खरीदण्यासाठी १५० रूबल्सपर्यंत पंचवार्षिक कर्ज मिळू शकते. कर्ज दिल्यानंतर परत फेडीची सुरवात गाईंच्या बाबतीत दुसऱ्या वर्षी व कालवडींच्या बाबतीत तिसऱ्या वर्षी होते.

## ग्रामीण जनतेस दिलेल्या इतर सवलती

काही काळ ग्रामीण विभागांमध्ये पक्क्या मालाच्या बऱ्याच वस्तू आणि अन्नधान्य यांच्या किंमतीवर एक " जादा ग्रामीण आकार " अस्तित्वात होता. ग्रामीण भागातील वितरणखर्च लक्षात घेता ७ टक्क्यांचा हा व्यावर्तक समर्थनीय असला तरी तो असंतोषाचे मूळ ठरला. २५ एप्रिल १९६५ पासून कपडे व पादत्राणे इ. अनेक वस्तूंवरील हा सरचार्ज उठविण्यात आला आहे. त्यामुळे एकूण खर्च ५२० दशलक्ष रूबल्स येईल असा अंदाज आहे. हा सरचार्ज ज्यांना लागू आहे अशा ग्रामीण भागातील इतर वस्तूंच्या किरकोळ किंमती पुढील वर्षाच्या सुरवातीस दुरुस्त केल्या जातील.

देशातील एकूण वीजेपैकी फक्त ४ टक्के वीजच सोव्हिएट शेतीकडून वापरली जाते. यातील २ टक्के वीज उत्पादनावर खर्च होते. असे असूनही शेतकऱ्यांना एवढ्याशा विजेसाठी नागरी ग्राहकांपेक्षा जास्त दर द्यावा लागतो. काही अवजारांबाबतही असाच फरक आहे. ब्रेझनेव्हने या गोष्टी दूर करण्याचे जरी आश्वासन दिले असले तरी योजनाकार इतक्या अवघड परिस्थितीत आहेत की ही विषमता कमी करणे पुढील वर्षीच शक्य होईल :—

" शेतीची अवजारे, सुटे भाग व साहित्य, आणि वीज यांच्या किंमती अशा आखल्या पाहिजेत की औद्योगिक व शेतकी ग्राहकांना द्याव्या लागणाऱ्या किंमतीत विषमता येणार नाही. पण या उपाययोजना अंदाजपत्रकातील अडचणींमुळे यावर्षी अंमलात आणता येणार नाहीत. रशियाच्या नियोजन खात्याने व अर्थखात्याने हा प्रश्न पुढीलवर्षी सोडविण्याच्या दृष्टीने साधन—सामुग्री जमविणे आवश्यक आहे."

खुल्या ' कोलखोझ ' बाजारपेठांमध्ये शासनामार्फत किंमती ठरविणे बंद केले जाईल, आणि इमारती व इतर सवलतींच्या ' बांधकामासाठी ' व आधुनिकीकरणासाठी पैसा उपलब्ध करून दिला जाईल. या बाजारपेठांमध्ये येणारे बहुतेक अन्नधान्य खाजगी शेतांकडून, सामूहिक शेतांच्या वाढीव उत्पादनातून आणि थोड्या प्रमाणात शिकारी व मच्छीमार यांच्याकडून येते. शिकारी व मच्छीमार जर त्यांचा माल विकावयास आणतील तर त्यांच्यावर सट्टेबाज असा शिक्का बसण्याची आता भीती उरलेली नाही. शेतकऱ्यांनासुद्धा रेल्वेस्टेशन्स आणि नदीवरील धक्क्याच्या ठिकाणी दुकाने ठेवण्यास परत परवानगी दिली जाईल.

## संभाव्य आर्थिक परिणाम

वर वर्णन केलेल्या सुधारणांचे एकूण परिणाम काय होतील याचा ढोबळ अंदाज करणेसुद्धा कठीण आहे. अत्यंत अनिश्चितता असल्याने कोणाही पाश्चात्य निरीक्षकापेक्षा जास्त माहिती असणारे रशियन अधिकारीही याबद्दल साशंक आहेत. उदाहरणार्थ, नियोजित उत्पादनाव्यतिरिक्त किती धान्य जादा खरेदी करावे लागेल हे बऱ्याच अंशी पिकांवर अवलंबून राहील, आणि याबद्दलची सध्याची चिन्हे तरी प्रतिकूल आहेत. यासाठी नवीन किंमत-कोष्टके आखावी लागतील. उदाहरणार्थ, एखाद्या सामूहिक शेतास आपली जनावरे पोसण्याऐवजी तेच धान्य दर टनामागे ५० टक्के जादा आकार ( प्रीमियम ) घेऊन सरकारला विकणे अधिक फायद्याचे ठरेल का ? नियोजनात धरलेल्या उत्पादना व्यतिरिक्त येणाऱ्या उत्पादनावर ५० टक्के प्रिमिअम देण्याच्या योजनेमुळे बराच संघर्ष निर्माण झाला असला पाहिजे. कारण प्रत्येक शेतावरील त्याचप्रमाणे जिल्ह्यातील सरकारी खरेदी-विक्री किमान पातळीवर आणण्याचा प्रयत्न केला. शिवाय १९६५ साली शेतीसाठी मंजूर केलेल्या कर्जाचा एकूण आकडा आपल्याला माहित नसल्याने यंदा आश्वासन दिलेल्या ७००० दशलक्ष रूबल्सपैकी किती भाग जादा आहे हे समजणे





अनुक्रमणिका

अशक्य आहे. १९६४ च्या समाधानकारक पिकांनंतर सामूहिक शेतांना दिलेल्या दीर्घ व लघु-मुदतीच्या मोठया ५००० दशलक्ष रूबल्स कर्जापैकी काही भागाची परतफेड होईल असा योजकांचा कयास होता. प्रत्यक्षात मात्र २२५० दशलक्ष रूबल्स एवढया कर्जावर पाणी सोडावे लागले आहे. पूर्वी योजलेल्या ५७०० दशलक्ष रूबल्स पेक्षा यावर्षीची शेतीतील सरकारी भांडवल गुंतवणूक जास्त होईल.

पण आपण जर सरकारी कर्ज परतफेडीतील अमाप तूट व शेतीत गुंतविलेल्या १००० दशलक्ष रूबल्स जादा कर्जामध्ये काही निश्चित आकडे मिळविले म्हणजे, खरेदी–किंमतीच्या वाढीपायी येणारा ३५०० दशलक्ष रूबल्सचा जादा खर्च, सामूहिक शेतीवरील करपद्धतीत सुधारणा केल्याने येणारी ५०० दशलक्ष रूबल्सची तूट आणि ग्रामीण सरचार्ज उठविल्यामुळे येणारी आणखी ५०० दशलक्ष रूबल्सची तूट–तर अंदाजपत्रकातील फेर वितरणाचा आकडा ५५०० दशलक्ष रूबल्सपर्यंत जाईल. ह्याविरुद्ध १९६५ सालचा नियोजित अंदाजपत्रकी खर्च ९९,४०० दशलक्ष रूबल्स आहे आणि १६५ दशलक्ष रूबल्सची अंदाजपत्रकी वाढ अपेक्षित आहे.

---













प्रा. सौ. प्रभा हातवळणे

# लोकवार्ता आणि अफवा

वार्ता च कौतुकवती विमला च विद्या
... ... ... प्रसरति स्वयमेव लोके ।

## सद्यःस्थिति व अफवा

भारत संरक्षण कायद्याच्या ३५ व्या कलमानुसार अफवा पसरविणे हा गुन्हा आहे. आपल्या सीमासंरक्षणार्थ आपले सैन्य उभे ठाकले आहे. युद्ध-विराम अस्थिर व अत्यंत स्फोटक आहे. कोठे कशी ठिणगी पडेल आणि कशाचे निमित्त होईल तो नेम नाही. तेथे नेमके काय घडत आहे ते कळण्याचा मार्ग नाही. इकडे आकाशवाणीच्या बातम्या ऐकल्या किंवा वृत्तपत्रे वाचली तर आपली सरशी झाली आहे, शत्रूची बरीच हानी झाली आहे असा दिलासा वाटतो. पाकिस्तानची फुशारकी ऐकली की मन चिंती ते वैरी न चिंती अशी गत होऊन जाते. मनाची पर्युत्सुकता, वार्तेचा अपुरेपणा आणि प्रचारतंत्र यातून अफवांचे वेडे पीक निर्माण होते.

युद्धकालात अफवांना उधाण आलेले आढळते. लॉर्ड बीव्हरब्रुकने म्हटल्याप्रमाणे "एकदा लढाईला तोंड फुटले की पहिला बळी सत्याचा !" अनेक प्रकारच्या वावड्या उडतात. क्षणात असे, तर क्षणात तसे, ऐकू येते. अतिरंजित, मिथ्या वार्तालापामध्ये सत्याचा सुगावा लागणे अशक्यप्राय होऊन जाते. विरोधी नागरिकांच्या मनात गोंधळ उत्पन्न करणे हे युद्धप्रचार-तंत्राचे उद्दिष्ट असते. तेव्हा अफवा पसरतात कशा ? त्यांच्या मुळाशी कोणती प्रेरणा असते ? युद्धकाली अफवांना येवढे उधाण येते, त्यांचे सत्य स्वरूप कोणते ? अफवा व लोकवार्ता यांच्यातले साम्य कोणते ? इत्यादि विवेचन मनुष्यस्वभावाची ओळख म्हणून उद्बोधक होईल.

अपुऱ्या आधारावर उभारलेली पण लोकात घबराट उत्पन्न करणारी बातमी म्हणजे अफवा. "ऐकीव" आख्यायिका, दंतकथा किंवा "थापा" लोकवार्तेत जमा होतील. अफवा ह्या अपुऱ्या माहितीवर आधारलेल्या असल्या तरी त्या सांगोसांगी झटकन् पसरतात. सर्वतोमुखी होण्यास त्यांना वेळ लागत नाही. याने प्रत्यक्ष डोळ्याने पाहिले, ह्यांनी त्याला सांगितली, व त्यांनी मला, अशा स्वरूपाची अफवा असते. तिचे दुसरे वैशिष्ट्य म्हणजे ही सहसा लेखनिविष्ट नसते. व प्रचार–प्रसार तोंडो-तोंडी किंवा कर्णोपकर्णी होत असतो. युद्धकालीन अफवा आणि इतर अफवा असे वर्गीकरण स्थूलमानाने होते. स्वपक्षाला प्रोत्साहन देण्यासाठी आणि शत्रुपक्षाला निरुत्साही करण्यासाठी अफवांचा प्रसार कौशल्याने साधतात. पहिल्या महायुद्धात एक अफवा उठली होती : स्फोटक द्रव्यांना लागणाऱ्या नैट्रोजन ग्लिसरीनसाठी इंग्रज सैनिकांच्या चरबीचा उपयोग जर्मनीत करतात. या बातमीमुळे इंग्रजांचा नुसता भडका उडून गेला. स. १८५७ च्या स्वातंत्र्ययुद्धात काडतुसांना गाईंची चरबी वापरतात या बातमीमुळे हिंदूंच्या धर्मभावनेला जबर धक्का पोहोचला होता. धर्मभेद, पक्षभेद, वर्णभेद, असल्या वर्मांचा फायदा घेऊन नागरिकांत अंतस्थ कलह पेटवणे, कलागती लावणे व फूट पाडणे ह्या भेदनीतीसाठी अफवा फार सोयीच्या. हिंदुस्थानातले शीख असंतुष्ट आहेत, मुसलमानांना सावत्रपणाची वागणूक मिळते, असा प्रचार पाकिस्तान सतत करीत आहे. अमेरिकेमध्ये नीग्रो व यहुदी लोकांविरुद्ध हुबेहूब अशाच प्रकारच्या अफवा दुसऱ्या महायुद्धात पसरल्या होत्या. स० १९४२–४३ मध्ये अशा अफवा ही अमेरिकेत मोठी राष्ट्रीय समस्या होऊन बसली होती. शत्रूचा द्वेष वाढेल अशा अफवा एकीकडे व अंतस्थ एकीला व आत्मविश्वासाला तडा जाईल अशा अफवा दुसरीकडे. यापैकी दुसऱ्या वर्गातील १००० अफवांचे विश्लेषण केल्यावर आढळून आले की यहुद्यांविरुद्ध ९·३%, निग्रोविरुद्ध ३·९%, प्रशासनाविरुद्ध २१·४%, लष्कराविरुद्ध १९·६%,



अनुक्रमणिका






अशी त्यांची वर्गवारी आहे. आपणांकडेही वर्गीकरणाचे प्रमाण या प्रकारचे असावे. प्रशासनाविरुद्ध, भारतीय मुसलमानांच्या पाकधार्जिणेपणासंबंधी, संरक्षणनिधीच्या अफरातफरीसंबंधी, लष्करी शस्त्रपुरवठ्याच्या अपुरेपणाबद्दल, तर शत्रूच्या हेरगिरी संबंधी, अशा या अफवा असतात.

काही दिवसापूर्वी नागपूरमध्ये ज्याच्या त्याच्या तोंडी एकच गोष्ट ऐकू येत होती : "अंबाझरी तलावाकडे जाणाऱ्या दोन गुरखा सैनिकांना पोलिसांनी पकडले. तपासणी केल्यावर त्यांच्याजवळ अत्यंत जहाल विषाचा साठा सापडला. तलावात जहर टाकून सर्व नागरिकांवर विषप्रयोग करण्याचा हा ह्यांचा बेत थोडक्यात फसला." एका तासाच्या आत दुसऱ्याच्या तोंडून हीच कथा पसरली तेव्हा गुरखा सैनिकांचे रूपांतर "बुरखा" घातलेले सैनिक असे झाले. श्री. काकासाहेब गाडगिळांनी पेशवाईतल्या पुणेरी अफवांचे वर्णन केले आहे. पुणेरी काय किंवा नागपुरी काय, पेशवाईतल्या काय किंवा इतर जमान्यातल्या काय, अफवांचे स्वरूप सर्वत्र, सर्व काली एकच.

युद्धकाळात अफवांना येवढा ऊत येतो, यात आश्चर्य नाही. जयपराजयाच्या, जीवन-मरणाच्या आंदोलनावर राष्ट्र असते, तेव्हा असे होणे साहजिक आहे. परंतु अफवा सुरू होण्यास काही लढाईच हवी असे नाही. ही नित्य व्यवहारातली तितकीच नित्य बाब आहे. किंबहुना युद्धकालीन असो की सामान्य परिस्थितीतील अफवा असो विश्लेषण केल्यास तेच मनोधर्म तिच्या मुळाशी आढळतात.

अर्धवट आधारावरची पण सांगोसांगी झपाट्याने पसरणारी, असे अफवेचे लक्षण आपण पाहिले. हिच्या सत्यासत्यतेविषयी शंका हे तर तिचे आवश्यक अंग. पण हेच तिचे मुख्य आकर्षण होय. डोळे मोठे करून आणि हळू आवाजात सुरुवात होते की : "मी आपलं नुसतं ऐकलं हो– खरं खोटं देव जाणे," तेव्हा काहीतरी खुसखुशीत चटकदार ऐकायला मिळणार म्हणून वाटणारी उत्सुकता 'हिच् कॉक सस्पेन्स'शी बरोबरी करणारी असते, आकर्षकता हे अफवेचे दुसरे लक्षण. ऐकणाऱ्याला व सांगणाऱ्याला गोडी वाटेल, अशीच ती असली पाहिजे. कोणत्या गप्पांच्या अड्ड्यावर कशा प्रकारच्या गोष्टी रंगतात, त्यावरून कोणत्या लोकांची मने कशात रमतात हे सहज समजते. गप्पांचे गुऱ्हाळ इतके रसाळ का? कारण कोणत्यातरी मानवी मूलप्रेरणेशी त्या संलग्न असतात. युद्धकाली पसरणाऱ्या अफवांचा संबंध जीवनमरणाशी असतो. तेव्हा याहून अधिक जिव्हाळ्याचा विषय कोणता असणार? अनेकदा या अफवा भयमूलक असतात. सन १९४५ च्या उन्हाळ्यात ॲटम बॉम्ब विषयी अनेक अफवा इंग्लंडमध्ये, अमेरिकेत, पसरल्या होत्या. "ॲटम बॉम्बच्या एका स्फोटामुळे सर्व पृथ्वी नष्ट होणार आहे, हा स्फोट लवकरच होणार आहे, अशा अफवांमुळे जनता अगदी भयग्रस्त होऊन गेली होती. अष्टग्रहीमुळे आपल्या देशात सर्वत्र कसे भीतीचे वातावरण पसरले होते, हे सर्वांना ठाऊक आहेच.

भयप्रद वदंता संरक्षणाच्या मूल प्रवृत्तीमुळे निर्माण होतात. काम प्रेरणेतून उद्भवलेल्याही काही असतात, ती नटी आणि तो नट यांच्या नव्या भानगडीत विश्वविद्यालयीन विद्यार्थ्याला गोडी वाटण्याचे कारण, ही प्रवृत्ती. ती नटी त्याची कोणी नाही किंवा तिला त्याने कधी पाहिलेही नाही. तो लंबू शरद आणि ती नकटी लिली यांचे 'म्हणे' (हा 'म्हणे' हा अपुऱ्या पुराव्याचा कबुलीजबाब समजावा) बरंच की गूळपीठ जमलं आहे! असल्या इतरांच्या भानगडीत व लफड्यात मन रमते, त्याचे तरी मूळ कारण तेच आहे.

कधी कधी एखाद्या— व्यक्तीविषयी वाटणाऱ्या असूयेमुळे त्याबद्दल अफवा उठतात. "येवढा गडगंज पैसा त्यानं जमा केला खरा, पण कसा ते माहीत आहे का? अहो, 'मी तर ऐकलं'.........! करायचा काय हा पैसा?" अशा स्वरूपात या अफवा फैलावतात. महिला समाजाच्या अध्यक्ष सरलाबाई उच्चपदामुळे पुष्कळ नावडत्या होतात. मग त्यांना झालेलं साधं सरदी-पडशाचं दुखणं ते काय आणि त्याचं अवडंबर ते केवढं! हे बारकंसं दुखणं बारिक तापात रूपांतरित होतं. मग हा बारका ताप "त्यांना म्हणे क्षयाची भावना झाली आहे," असं नवं स्वरुप धारण करतो आणि मग "त्यांची अगदीच आशा नाही" असं शेवटी ऐकू येऊ लागतं! कित्येक










लोकांच्या मृत्यूसंबंधी अफवा अशाच तीव्र नावडीमुळे निर्माण होतात. "हिटलर मेला" ही वार्ता कितीदा तरी उठली होती. "चाऊ" भयंकर आजारी आहे, ही बातमी अशाच प्रकारची. याच्या अगदी उलट सुभाषचंद्र बोस जिवंत असल्याच्या कितीतरी अफवा आपण मधून मधून ऐकत असतो. शैलमारी आश्रमातील साधू म्हणजेच नेताजी, या वदंतेचा पगडा जनमनावर येवढा आहे की नेताजींच्या निकटवर्ती आप्तेष्टांनी इन्कार केला तरीही 'येरे माझ्या मागल्या' प्रमाणे ही वार्ता मधे मधे डोके वर काढतेच! खरे काय आहे काय नाही हे समजून घेण्यासाठी अफवांची वावडी सोडतात. 'खडा टाकून पाहिला,' या स्वरूपाच्या या अफवा असतात. ज्या व्यक्तीसंबंधी त्या असतात त्यांच्या आप्तेष्टांकडून संबंधियांच्या मार्फत या ऐकीव बातम्यांबद्दल त्यांची प्रतिक्रिया न्याहाळावयाची असते.

खऱ्या खोट्या गप्पा असोत किंवा संशयास्पद अफवा असोत, कल्पित आणि सत्य यांचे बेमालूम मिश्रण त्यात आढळते. साध्या शिळोप्याच्या गप्पा असल्या तरी तिखट मीठ लावून सांगितल्या तर खमंग लागतात. या सत्यकल्पिताच्या अद्‌भुत रसायनामध्ये आणखी एक वैशिष्ट्य आढळते- गप्पांचे किंवा अफवांचे संक्षेपण हे होय. प्रथम ओबडधोबड, स्थूल व भोंगळ स्वरूपातल्या या बातम्या वापरात अधिकाधिक संक्षिप्त, सुटसुटीत, नेटक्या व घाटदार बनत जातात. सुरुवातीला अर्धवट, अपूर्ण आणि गूढ पण अनिश्चित आवरणात गुरफटलेली अफवा पसरता पसरता निश्चित स्वरूपाची बनत जाते. कोणीतरी, कोणालातरी, काहीतरी व कोठेतरी अशा स्वरूपात लपेटलेली अफवा अधिक निश्चित बनते. या व्यापारात ती अधिकाधिक संक्षिप्त होत जाते, हे लक्षण अफवांपुरतेच मर्यादित नसून इतर कथा, वार्ता यांनाही लागू आहे. पुढेपुढे तर म्हणींप्रमाणे आपण त्यांचा उपयोग करू लागतो. 'कोल्ह्याला द्राक्षे आंबट' किंवा आता पुन्हा 'पानशेत' 'जालियनवाला बागे'ची पुनरावृत्ती होणार काय? अशा एकेरी शब्दात सुद्धा संपूर्ण कथेचा, वार्तेचा, किंवा अफवेचा उल्लेख होऊ शकतो. सर्वतोमुखी झालेल्या वार्तेचे किंवा कथेचे हे लक्षण आहे.

अफवेची तुलना स्वप्नांशी होते. स्वप्नातून दचकून जागा आलेल्या माणसाला स्वप्नाबद्दल काहीतरी विस्खलित, असंबद्ध व विसंगत वृत्तांत सांगता येतो. पण तेच स्वप्न सकाळपर्यंत रेंगाळले की अधिक सुसंगत, तर्कबद्ध व सुसंघटित होते. अफवेचेही नेमके असेच होत जाते. जे साधे दुवे अपुऱ्या पुराव्यामुळे खिळखिळे राहिलेले असतात ते वापरात पक्के होत जातात व हे होत असता ती अधिकाधिक संक्षिप्त होत जाते.

संक्षेपणाच्या या व्यापाराबरोबरच कळत न कळत तिचे दुसरे लक्षण, रूपांतर प्रगट होत जाते. गुरखा सैनिकांचे रुपांतर बुरखा घातलेला सैनिक, असे रूपांतर झल्यावर ती अफवा अधिक स्पष्ट, अधिक लक्ष्यवेधी होते. एखाद्याची निंदा हे ईप्सित असेल तर ती अफवा अधिक वापरामुळे जीवघेणी, बोचक होत जाते. घासून घासून पाते जसे अधिक धारदार बनते, तशी वापरून वापरून अफवाही अधिक धारदार बनत जाते.

जसे व्हावे अशी आंतरिक इच्छा असते, तसेच झाले आहे, असे माणसाला वाटू लागते. 'मनी वसे ते स्वप्नी दिसे' हे केवळ स्वप्नापुरतेच मर्यादित नाही, व्यवहारातल्या इतर बाबींनाही ते लागू आहे. फ्रॉईडने स्वप्नांचे विश्लेषण करताना या गोष्टींवर बराच भर दिला. आपल्या सुप्त इच्छा (ज्यांच्या जागृतावस्थेत आपण इन्कार करू) त्या स्वप्नात प्रगट होतात. अफवांबद्दलही हेच खरे आहे. स्वपक्षाने विजय मिळवावा या तीव्र इच्छेमधून कुठेतरी विजय मिळवल्याची वार्ता निर्माण होते. आणि साथीच्या रोगाप्रमाणे तिचा झपाट्याने प्रसार होतो. आपल्या इच्छेचे आरोपण आपण या वार्तांमार्फत करीत असतो. हळूहळू त्यांना सत्य मानू लागतो. मात्र प्रत्येक अफवेच्या मुळाशी आपली सुप्त इच्छा असते असे नाही. त्यांच्या मुळाशी दुसराही मनोधर्म असू शकतो. शत्रूची धूळदाण झाली, आपल्या सैन्याने अतुल पराक्रम केला, अशा वार्तांमुळे स्वपक्षाचा उत्साह व चेव अल्पकाळपर्यंत कायम राहिला तरी असत्याच्या ढिसूळ पायावर त्याची उभारणी असल्यामुळे अखेरीस होणारा भ्रमनिरास अधिक दुःखदायक होतो. याचे प्रत्यंतर हिटलरी प्रचारामुळे सर्व जगाला मिळाले.

अफवांचे आणखी एक लक्षण म्हणजे त्यांचे अल्पजीवित्व. वळवाची सर पडता पडता थांबते, तशी अफवा पसरता पसरता मध्येच एकदम विरते. नेहमीच असे असते असे नाही. शैलमारिमहाराज म्हणजे









नेताजीच अशा प्रकारची अफवा दीर्घ काळ तग धरून असते. पण अफवा फार थोडावेळ टिकतात. अफवांचे हे वेडे पीक भरमसाट क्षणजीवी आहे. नेमक्या बातमीच्या अभावी अफवा फैलावते. निश्चित बातमी पुराव्यानिशी मिळाली की अफवेचे कार्य संपते. म्हणजे पसवल्यावर केळ जशी मरते, त्याप्रमाणे निश्चित बातमीचा जन्म झाला की अफवा मरते. वार्ता अर्धवट, अपुरी व अनिश्चित आहे. म्हणून तर अफवेची फुशारकी. शरदचे व लीलीचे लग्न झाले की त्यांच्या प्रेमासंबंधीच्या अफवांची सद्दी संपली. आता त्या युगुलासंबंधी अफवा पसरल्या तर वेगळ्या क्षेत्रातल्या. आज इंडोनेशियातील अंतस्थ राजकीय परिस्थितिबद्दल अनेक प्रकारच्या वावड्या उडत आहेत. कारण बातमी अपुरी मिळते. नक्की काहीच कळत नाही. मागच्या महायुद्धांत उलटसुलट अनेक अफवांचे पेव फुटून त्यापायी जनता अगदी जेरीस आली होती.

अफवा नेहमीच बुद्धिपुरस्सर फैलावतात असे नाही. त्या जाणुनबुजून पसरविल्या तर त्यांच्यामागे विशिष्ट हेतु असतो. शत्रुपक्षाने सहेतुक पेरलेल्या अफवा अत्यंत हानिकारक ठरतात. विशेषतः युद्धजन्य परिस्थितीत या भावनांना धक्का देणारे असे अफवांचे स्वरूप असण्याचा संभव फार असतो. काडतुसांना गायीची चरबी लावली असे ऐकले मात्र, मग ते खरे असो की खोटे. त्यामुळे केवढा असंतोष आणि द्वेष पसरला !! किती त्वेषाने शिपाई लढले ! इत्यादि प्रकार ठाऊक आहेतच. आपल्या सैन्याला पुरेसे वस्त्र प्रावरणही नाही असे नुसते ऐकले मात्र, अंगाचा थरकाप होतो ! मन संभ्रमात पडावे, आत्मविश्वास कमी व्हावा, अंतस्थ कलागती वाढून बेबनाव वाढावा, या हेतूने प्रतिपक्ष मुद्दामच काही अफवा मोठ्या कौशल्याने पेरीत असतो. अफवा पसरविणे हे प्रचारतंत्राचे एक अवश्यमेव अंग झाले आहे. लढाईच्या तंत्रात ते एक प्रभावी आयुध आहे. म्हणून अफवा पसरू न देणे आपले कर्तव्य आहे. अफवांच्या साहाय्याने फोडा-झोडा हे अंतस्थ कलागतीसाठी नाझी तंत्राचे पहिले सूत्र होते. घबराट व संभ्रम ' हे ' दुसरे सूत्र.

### नागरिकांचे कर्तव्य

आपले सरकार आकाशवाणीवरून, भित्तिपत्रकांद्वारे, वृत्तपत्रांमार्फत सावधगिरीचे इशारे देत आहे. अफवा पसरवू नका. " निष्काळजीपणे काही बोलू नका. " ही शिकवण आमजनतेस देण्यासाठी अनेक क्लृप्त्या व योजना आखल्या आहेत. अनेक घोषवाक्ये रूढ झाली ' बोलाल तर नाश होईल ', ' जिभेला लगाम लावा, ' ' शत्रूचे कान लांब आहेत ' अशी अनेक घोषवाक्ये तयार झाली आहेत.

" झिप् युअर लिप् अँड सेव्ह ए शिप् " हे घोषवाक्य दुसऱ्या महायुद्धात अमेरिकेत फार प्रभावी झाले होते.

घोडदौडीच्या गतीने धावणाऱ्या व झपाट्याने पसरणाऱ्या या अफवा काबूत ठेवणे हे अत्यंत आवश्यक आहे. नेमक्या बातमीच्या अभावी अफवा पसरते, तेव्हा पुरेशी व संपूर्ण बातमी द्या हे म्हणणे ठीक आहे. सैन्याची हालचाल, शस्त्राच्या पुरवठ्याच्या जागा, सैन्याचे आक्रमण या गोष्टीसंबंधी मौन आवश्यक असते. तेव्हा गुप्तता राखणे हे अपरिहार्य आहे, जनतेला अपुऱ्या बातमीमुळे वाटणारी उत्सुकता हीही अपरिहार्य आहे. पण अपुऱ्या बातमीवर संतुष्ट रहाण्याचा धडा शिकणे आवश्यक आहे. अफवांना वाव न देण्यासही शिकले पाहिजे. लष्करी गुपिते साभाळण्यास शिकले पाहिजे. : " काल रात्री ××× कडे ८० रणगाडे जाताना मी पाहिले " किंवा " उद्या सैनिकांची एक स्पेशल येथून निघणार आहे, " या बातम्या कळल्या तरी त्यांचा प्रसार करणे, त्याबद्दल बोलणे धोक्याचे असते. माहीत नाही, ते तर बोलू नकाच; पण जे माहीत आहे, तेही पोटातच राहू द्या; ओठांपर्यंत त्याची मजल येऊ देऊ नका. ही शिकवणूक दुसऱ्या महायुद्धात इंग्लंडच्या, अमेरिकेच्या इतकी अंगवळणी पडली होती की लढाईतल्या कितीतरी अधिकृत बातम्या केवळ अफवा असतील म्हणून तेथील जनता त्यांच्यावर विश्वास ठेवीनाशी झाली होती. हेरगिरीपासून सावध राहण्याची तत्परता इतक्या थरापर्यंत गेली होती की प्रत्येक झुडुपामागे आणि प्रत्येक बिछान्याखाली कोणी हेर दडी देऊन बसला आहे. अशा समजुतीने ते वावरत असत. अफवा आटोक्यात टेवण्यासाठी अमेरिकेत केलेले आणखी काही प्रयोग लक्षात घेण्यासारखे आहेत. कोणतीही अफवा किंवा अफवेसंबंधी प्रश्न ' अफवा केंद्रा'








कडे पाठविण्यास सांगितले. नंतर त्या पडताळून पाहणे, तत्संबंधीची माहिती देणे आणि त्यामागील पार्श्वभूमी स्पष्ट करून सांगणे, त्यांतील सत्य किती, काल्पनिक काय, याची जाहीर चर्चा या अफवाकेंद्राने वर्तमानपत्रातून चालविली. ही कल्पना इतकी लोकप्रिय झाली आणि उपयुक्त ठरली की ४० वृत्तपत्रांनी "अफवा केंद्रे" आपापल्या पत्रात सुरू केली. राजकारणी, मुत्सद्दी व मानसशास्त्रज्ञ यांच्या सल्ल्याने यातील चर्चा येऊ लागल्यामुळे शंका कुशंका, त्यांचे विचार, त्यांच्या इच्छा, आकांक्षा व सर्वसाधारण लोकमत याचा अंदाज सरकारला येऊ लागला. शत्रूच्या कुरापती, खोड्या व मिथ्या वार्तारोपण यांची कल्पना होत गेली. अफवाकेंद्रात येणाऱ्या काहींचे स्वरूप असे होते: –

**अफवा :** देशातील काही अल्पसंख्यांक (ज्यू, कॅथॉलिक इ०) अमेरिकेशी राजनिष्ठ नसून ते बंड करणार आहेत, सरकार ताब्यात घेणार आहेत, लष्करात भरती होण्यास ते नाराज आहेत.

**उत्तर–** यात सत्याचा एक अंशदेखील नाही.

**प्रश्न–** जातीय अफवा किती धोक्याच्या असतात ?

**उत्तर–** अमेरिकेत प्रसरित होणाऱ्या अफवांत सर्वांत हानिकारक व विघातक अफवा जातीय आहेत. जातीय अफवा पसरवणारा कारखान्यांत स्फोट करणारापेक्षा जास्त हानिकारक ठरतो, लोकशाहीला त्यामुळे धोका पोहोचतो. ... .... ..."

प्रत्येक वस्तीमधून अफवा मिळविण्यासाठी काही अधिकारी फिरत असत, टॅक्सी ड्रायव्हर, न्हावी किंवा दुकानदार, यांच्या कडून अफवा भरपूर ऐकू येतात.

परंतु या सर्वांपेक्षा देखील अधिक कौतुकास्पद, अधिक आश्चर्यजनक घटनेचा उल्लेख ९ ऑगस्ट १९४५ च्या बॉस्टन येथील "ग्लोब" मध्ये आला होता तो वाचून आपण अगदी थक्क होऊन जातो. बायरन प्राइस या सेन्सारशिपच्या डायरेक्टराने युद्धातील सर्वांत गुप्त रहस्य कसे सांभाळले ? म्हणून लेख लिहिला.

ॲटमबॉंबच्या शोधासंबंधीचे हे रहस्य कसे सांभाळले, त्याची माहिती त्यात आहे. ध्वनिक्षेपणकेंद्रे, वृत्तपत्रे, ग्रंथप्रकाशक यांची प्रशंसा पण केली आहे. वृत्तनियंत्रणाच्या स्वेच्छायुक्त सहकार्याने २०,००० वृत्तकेंद्रे, ११००० साप्ताहिके, २००० दैनिके आणि हजारो ध्वनिक्षेपण केंद्रे, याव्यतिरिक्त विद्यापीठीय वृत्तपत्रे व अनेक ग्रंथप्रकाशने, यापैकी कोठेही गाफिलपणा झाला असता तर हे रहस्य शत्रूच्या हाती जाण्याचा संभव होता. सर्वांना वृत्त नियंत्रणाधिकाऱ्याने इशारा एकदाच दिला होता. पण शिस्तबद्ध नागरिकांनी तो आदर्शरीतीने पाळला. आपले राष्ट्र-प्रेम त्यानी अशाप्रकारे व्यक्त केले. त्याचा इशारा असा होता: " नवीन किंवा गुप्तशस्त्रांसंबंधी. शस्त्रप्रयोगासंबंधी कसलीही बातमी प्रसिद्ध होऊ नये.

ह्या योजनेत लक्षावधी लोक गुंतले असताही गुप्तता छान पाळली. अणु केंद्रे तीन बांधली, सवालाख सुमार कामगार राबले. अनेक विद्यापीठांतील प्राध्यापकांनी तेथे काम केले. तरी कुठेही ह्या प्रकल्पाची खबर "प्रकट" झाली नाही.

काही दिवसानंतर दुसरा आदेश अधिकाऱ्यांनी दिला. रेडिअम्, रेडिओ ॲक्टिव्हिटी, पोलोनियम, युरेनियम ... ... इत्यादिबद्दल बातमी छापावयाची नाही. कारण अणुकेंद्रात तयार झालेल्या अस्त्रांची चाचणी सुरू झाली होती. जेथे जेथे हे चाचणी प्रयोग केले तेथील हजारो नागरिकांनी ते पाहिले असले पाहिजेत. तरीही हे "रहस्य" बाहेर फुटले नाही हे विशेष नव्हे का ? दुसऱ्या महायुद्धात ब्रिटिश अधिकाऱ्यांनी एक रहस्य राखण्यासाठी एक 'लोणकडी' पसरविली. तिला शास्त्राचा आधार घेतला. तिच्या आधारे आहार सुधारला आणि आपले गुपित कोणास कळू दिले नाही. 'रडार'चा शोध लागल्यामुळे ब्रिटिश वैमानिक काही पराक्रम गाजवीत होते. पण 'रडार'चे श्रेय हुशार अधिकाऱ्यांनी गाजरांना दिले. गाजरात "कॅरटीन" नामक द्रव्य आहे, त्यामुळे वैमानिकांची नजर अधिक तीक्ष्ण होते. हवाईदलात गाजरांचा आहार मुद्दाम सुरू केला आहे इत्यादि अफवा–त्यावेळी हे शास्त्रीय 'सत्य' होते–पसरविल्या. आता बऱ्याच वर्षांनी "कॅरटीन"चा परिस्फोट झाला. पण आपल्याही आहारात गाजरांचा खास प्रवेश ह्या अफवेमुळे झाला ! ! गाजरे थोर ठरली.

अफवा फैलावण्यात किंवा त्या फैलावू नयेत म्हणून इतर देशानी काय केले ते थोडक्यात सांगितले. "अफवा" वाटेलतशा पसरू नयेत म्हणून योग्य ती खबरदारी घेतली नाही तर अफवा आपणावर अधिकार गाजविल्यावाचून रहाणार नाही. म्हणून--

**सा व धा न !**








प्रा. जी. डी. वर्धमाने

## सोळाव्या शतकातील जैन मराठी काव्य :

# जसोधररास : (काव्यपरिचय)

### (१) सोळाव्या शतकातील साहित्यकृती

पुणे विद्यापीठातील मराठी विभागाचे प्रमुख डॉ. शं. गो. तुळपुळे यांनी संपादित केलेल्या 'महाराष्ट्र सारस्वता' ची पाचवी आवृत्ती चाळत असता 'सोळाव्या शतकातील आणखी काही कवी' या पृष्ठक्रमांक ८०० वरील प्रकरणाकडे माझे लक्ष गेले. प्रा. सुभाषचंद्र अक्कोळे, प्रा. डॉ. जोहरापूरकर यांनी अत्यंत परिश्रमपूर्वक संपादिलेल्या ग्रंथांना 'जैन पंथीयांचे वाङमय' या सदरात डॉ. तुळपुळे यांनी स्थान देऊन आपल्या सहिष्णुवृत्तीचे जे आविष्करण केले आहे ते अत्यंत महत्त्वाचे आहे असे मला वाटते. कमळाने उमलावे व भ्रमराने आस्वाद घ्यावा, कवींनी रसपूर्ण काव्ये लिहावीत व रसिकांनी त्यांचा आस्वाद घ्यावा, रत्नाने खाणीत जन्म घ्यावा व त्याला पैलू पाडून शिल्पीने त्याचे सौंदर्य वृद्धिंगत करावे हा निसर्ग-नियम आहे. या नियमाला अनुसरून डॉ. तुळपुळ्यांनी मराठी शारदेच्या दरबारात कवी मेघा, नागो आया, दयासागर, वीरसागर, इत्यादी कवींना स्थान देऊन त्यांचा गौरव केला ही अत्यंत उचित अशीच गोष्ट झाली आहे. मराठी ही भारतातली एक प्रगत भाषा असून त्यातील प्राचीन वाङमय तर अत्यंत समृद्ध असे आहे. प्राचीन मराठी साहित्याचा आणि धर्माचा अत्यंत जवळचा असा संबंध आहे. धर्मपंथांच्या आश्रयानेच मराठी साहित्याचा उद्गम आणि विकास झाला आहे. या साहित्याची निर्मिती करणारे लोक प्रायः संन्यस्त वृत्तीचे साधुपुरुष होते. प्राचीन धर्म-ग्रंथातील अध्यात्म, तत्त्वज्ञान याशिवाय सर्वसामान्य लोकांची मने उन्नत होणार नाहीत याची कल्पना वरील संतकवींना असल्याने त्यांनी आपल्या काव्यात तेच सांगण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु वरील अध्यात्म संस्कृत भाषेच्या कडीकुलुपात असल्याने सामान्य जनतेसही त्याचा बोध व्हावा म्हणून त्यांनी ते मराठी भाषेत आणून फार मोठे कार्य केले आहे. लोक-कल्याणाची तीव्र तळमळ व प्रबल कवित्वशक्ती यामुळे संतांनी निर्मिलेले वाङमय शिव आणि सौंदर्य यांच्या कसोटीलाही पूर्णपणे उतरते. वारकरी पंथ, महानुभाव पंथ, दत्तसंप्रदाय, नाथपंथ आणि रामदासी संप्रदाय या पाच धर्मपंथीयांचे वाङमय आतापर्यंत मराठी भाषिकांना उपलब्ध झाले आहे. त्यांनी केलेली साहित्यसेवा थोर अशीच असून त्या त्या धर्मपंथातील लेखक-कवींना 'महाराष्ट्र सारस्वता'च्या रूपाने मराठी शारदेच्या दरबारी उचित असे स्थान मिळाले आहे. मराठी भाषेची उत्पत्ती, विकास पहात असताना अनेक जैन कवींचा मधून मधून उल्लेख तेवढा दिसतो. मराठी भाषा ही 'जैन महाराष्ट्री' पासून निर्माण झाली असे डॉ. शं. गो. तुळपुळे यांनी 'यादवकालीन मराठी भाषा' या विद्वन्मान्य ग्रंथात सप्रमाण सिद्ध केले आहे. 'हे चावुण्डरायें करवियलें' हे मराठीतले पहिले वाक्य तर म्हैसूर राज्यातील श्रवणबेळगोळ येथील विशालकाय जैन मूर्तीच्या– गोमटेश्वराच्या– चरणावर कोरलेले आढळून येते. इतर पंथीयांनी मराठी भाषेत लेखन करून सरस्वतीची उपासना केलेली असताना मराठी भाषेशी प्रथमपासून संबंधित असलेले जैन मागे का असावेत असे कोडे मराठीच्या अभ्यासकांना पडे. पण अलीकडे जे संशोधन झाले आहे त्यावरून जैनांनी देखील मराठीत साहित्यसेवा बजावली आहे असे आढळून आले आहे. अलीकडे उपलब्ध झालेल्या सोळाव्या शतकातील अशाच एका जैन साहित्यकृतीचा– जसोधररास– या काव्यग्रंथाचा– परिचय करून देण्याचा अल्पसा प्रयत्न या लेखात केला आहे. मराठीतील ज्येष्ठ, श्रेष्ठ, साहित्यिकांनी वरील काव्यकृतीकडे अवधानपूर्वक आपुलकीने पाहिले तर या लेखाचा हेतु साध्य झाला असे मी समजेन.











## ( २ ) कळिमळनाशिनी कथा

बारामती महाविद्यालयातील मराठीचे प्राध्यापक श्री. सुभाषचंद्र अक्कोळे यांनी चार-पाच वर्षांपूर्वी सोळाव्या शतकातील कवी मेघाविरचित 'जसो-धररास' या काव्यग्रंथाचे परिश्रमपूर्वक संशोधन केले आहे. दीडशे पानांचे हे मराठी काव्य अत्यंत रसपूर्ण असून पंडित मेघराज किंवा मेघा या कवीने सोळाव्या शतकाच्या पूर्वार्धात ते रचिले आहे. ज्ञानेश्वर, एकनाथ, रामदास, मोरोपंत, मुक्तेश्वर इत्यादी संत व पंडित कवींनी काव्यनिर्मितीचा जो हेतु उराशी बाळगला होता त्याच हेतूने प्रेरित होऊन पं. मेघाने 'कळिमळ-नाशिनी' धर्मकथा सांगितली आहे. वाणीत काव्य चांगले, काव्यात रसपूर्ण काव्य सरस आणि रसपूर्ण-काव्यापेक्षाही अध्यात्माचा किंवा परतत्त्वाचा स्पर्श झालेले काव्य श्रेष्ठ अशी ज्ञानेश्वरांची श्रेष्ठ काव्या-संबंधीची कल्पना होती. याच कल्पनेने प्रेरित होऊन पं. मेघाने जैन साहित्यात महत्त्वपूर्ण स्थान पावलेली यशोधराची कथा आपल्या काव्यासाठी निवडली. पं. मेघराज म्हणतो,

आता सांघैन धर्मकथा। जरि स्याहृणा होईल श्रोता
रज सांडौनि निज घेतां। सुपु जैसा ॥
ऐसा होईल श्रोता। तरि सांगैन धर्मकथा
निज आणि परहिता–। कारणें देखा ॥

संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश, कन्नड, तामीळ, हिंदी, गुजराती इत्यादी जैन ग्रंथात काव्यरूपाने अवतरलेली यशोधराची सुप्रसिद्ध कथा आपल्या काव्यासाठी निवडून तद्वारा धर्माचे माहात्म्य ठसविण्याचा प्रयत्न कवी मेघराज याने केला आहे. मेघराज हा जसा पंडित होता त्याप्रमाणे तो आध्यात्मिक वृत्तीचा श्रेष्ठ कवी होता. अध्यात्म, पांडित्य, आणि कवित्व यांचा दुर्मिळ संगम त्याच्या ठिकाणी झाला होता. जसोधररासाचे रसग्रहण करताना आपल्याला वरील तिन्ही गुणांचा प्रत्यय येतो.

## ( ३ ) आख्यान काव्य

'जसोधररास' हे आख्यानकाव्य असून त्यात यशोधराची कथा प्रभावीरीत्या सांगितली आहे. आख्यान हा कथात्मक काव्याचा महत्त्वाचा प्रकार होय. मराठीत रामायण, महाभारत व पुराणे यातील कथांवर अनेक आख्याने रचण्यात आली असून ती बहुतेक धार्मिक हेतूने लिहिण्यात आली आहेत. जैनांनी देखील संस्कृत, प्राकृत व अपभ्रंश भाषांत इ. स. पाचव्या शतकापासून अनेक आख्याने लिहिली असून 'जसोधररास' हे सोळाव्या शतकातले मराठीतले सुमारे ११०० ओव्यात रचलेले आख्यानकाव्य आहे. आख्यान म्हणजे केवळ कथाही नव्हे व केवळ काव्यही नव्हे. कथात्मक कवितेचा, हा प्रकार असल्याने कथा व काव्य या दोन्ही दृष्टींनी त्याकडे पहावयाचे असते! लघुकथेप्रमाणे त्यात एखादा प्रसंग महत्त्वाचा व केंद्रित असून इतर अनेक प्रसंग केंद्रवर्ती प्रसंग परिपुष्ट करण्यासाठीच योजीत असतात. वाचकांच्या मनावर एकच एक संस्कार उमटविणे हे जसे लघुकथेचे कार्य असते त्याप्रमाणे आख्यानकाव्यातील सर्व प्रसंगातून एकच सलग व स्वयंपूर्ण कथानक आकारास यावे लागते व त्याचा मनावर एकमेव परिणाम व्हावा लागतो. या दृष्टिकोनातून आपण जसोधर किंवा यशोधर कथेकडे पहाणार आहोत.

## ( ४ ) जसोधररासाची कथा :

प्राचीन आर्यांनी यज्ञसंस्थेला महत्त्व दिल्यामुळे आपल्या सकल कामना पूर्ण करण्यासाठी मोठमोठे यज्ञ केले जात व त्यात अनेक पशूंचा बळी दिला जाई. यज्ञातील या हिंसेला जैन व बौद्ध यांचा जबरदस्त विरोध झाल्यामुळे यज्ञसंस्थेला व वैदिक धर्मालाही ओहोटी लागू लागली. ती थांबविण्यासाठी वैदिक विद्वान माधवाचार्यांनी यज्ञप्रसंगी होणाऱ्या हिंसेच्या ऐवजी जर तांदुळाच्या पिठाचा पशु बळी दिला तरी चालतो अशी सुधारणा केली. यशोधर काव्यात अशा पशुबळीचा निषेध केला आहे. प्रत्यक्ष प्राणिवध नाही केला तरी प्राणिवधाची इच्छा किंवा अभिलाषा धरून निर्जीव प्राण्याचा बळी दिला तरी पशुवधाच्या हिंसेतून मानवाची सुटका होत नाही हे पंडित मेघा या कवीला दाखवावयाचे आहे. हिंसाचार केल्यामुळे यशोधर राजा व त्याची आई चंद्रमती यांना कोणती दुःखे भोगावी लागली हे सांगून जीवनात अहिंसेला किती महत्त्व आहे हे त्याने स्पष्ट केले आहे.

भरतखंडातील राजगृह नगरीत या कथेला सुरुवात होते. तेथे मारिदत्त नावाचा राजा असतो. त्या नगरीत



अनुक्रमणिका

कालिमातेचे–चंडमारीचे– देवालय असून त्या देवीच्या उत्सवाच्या वेळी एक दांभिक भैरव जोगी येतो. त्याच्याकडून राजाला आकाशगामी विद्या घेण्याची इच्छा होते. त्यासाठी भैरवाच्या आज्ञेप्रमाणे प्रत्येक जीवांच्या जोडप्यांचा चंडमारी देवीपुढे बळी देण्यास तो तयार झाला. मंदिरात देवीच्यापुढे बळी देण्यासाठी कोंबडा-कोंबडी, बकरा-बकरी, मोर-लांडोर, चिमणा-चिमणी अशी पशुपक्षांची जोडपी जमविली होती. राजा मारिदत्ताने मानवी तरुण जोडप्याचा चंडमारीस बळी देण्याचा विचार केला व तसे सुंदर मानवाचे जोडपे वधासाठी पकडून आणण्याची कर्मचाऱ्यांना आज्ञा दिली. राजाचे कर्मचारी शोधास निघाले असता सहजाचार्यांच्या संघातील नव्यानेच दीक्षित झालेल्या अभयरुचि व अभयमति या बहीणभावांवर त्यांची दृष्टी गेली. त्यांनी त्यास पकडून चंडमारीपुढे उभे केले. मरणाच्या दारात उभे असूनही आपली मानसिक शांती ढळू न देता मोठ्या आनंदाने व हसतमुखाने उभी असलेली संन्यस्त बहीणभावंडे पाहून राजास आश्चर्य वाटले. त्यांच्या हत्येसाठी बाहेर काढलेली तलवार म्यान करून मोठ्या जिज्ञासेने त्याने त्यांचा इतिहास विचारला.

अभयरुचीने सांगितलेली कथा अशी : माळव्यातील उज्जैन नगरीचा राजा जसौध व राणी चंद्रमती यांना जसोधर (यशोधर) नावाचा मुलगा झाला. त्याचे अमृतमती नावाच्या एका सुंदर राजकन्येशी लग्न झाले. त्यांना जसोमती नावाचा मुलगा झाला. जसोधाने जसोधरावर राज्यकारभार सोपवून संन्यासदीक्षा घेतली. जसोधर आपल्या अमृतमती राणीसह सुखाने काळ घालवीत असता एके दिवशी पहाटे राणीने राजवाड्यातील कुबड्या माहुताला मधुर स्वराने गाताना ऐकले. त्या मधुर गाण्याने ती त्यावर आसक्त झाली. माहूत कुबडा व कुष्टरोगी होता, तरीपण ती मूर्ख राणी त्याच्या प्रेमात सापडून त्याच्याशी रममाण झाली. हे राजाच्या लक्षात येताच जणू त्याच्यावर वज्राघात झाला. राज्यकारभाराचा त्याग करून संसारविरक्त होण्याचा त्याने विचार केला. आपल्या मुलावरील हे संकट जाणून राजमातेने– चंद्रमतीने– चंडमारीला पशूचा बळी देण्याचा उपदेश केला. राजा जैनधर्मी असल्याने पशुबळी देण्यास तो तयार होईना. शेवटी आईच्या आग्रहास्तव तांदुळाच्या पिठाचा पशू करून चंडमारीस बळी देण्याचे ठरविले. तेथून दुःखपरंपरा चालू झाली. अमृता राणीस आपल्या दुर्वर्तनाची वार्ता जसोधराला व राजमातेला कळल्याचे समजले. ती त्यांचा द्वेष करू लागली. त्याचा परिणाम तिने त्यांना विष घालून मारण्यात झाला. यानंतर जसोधर व राजमाता चंद्रमती यांनी लागोपाठ सात भवांपर्यंत पशुपर्यायात जन्म घेऊन दुःख भोगले.

'याप्रमाणे तांदुळाच्या पिठाच्या कोंबड्याचा वध केल्याने आम्हाला त्या कर्माची फळे म्हणून सात भवांपर्यंत पशुपर्याय धारण करावे लागले व अनेक प्रकारची दुःखे सहन करावी लागली. अर्थात् प्रत्येक प्राण्यावर येणारी संकटे त्याच्या पूर्वकर्माची फळे होत. आमच्या पूर्वसंचित कर्माचेच हे फळ असल्याने आम्ही आताच्या संकटास भीत नाही. हे सारे अज्ञानाचे दृश्य पाहून आम्हास हसू आले.' अभयरुचीने त्याचा वध करण्यास सज्ज झालेल्या मारिदत्तास सांगितले.'

ही कथा ऐकल्यानंतर मारिदत्ताचा अहिंसाधर्माकडे कल झाला. त्याने अहिंसा धर्माची दीक्षा घेतली व गावात यापुढे कोणीही चंडमारीस बळी देता कामा नये अशी ग्वाही फिरविली. देवतांच्या पूजेचे स्वरूप बदलून ती विशुद्ध स्वरूपाची केली. याप्रमाणे अहिंसाधर्माचे महत्त्व या कथेच्या द्वारे दाखविण्यात आले असून जसोधर व अमृता या दोन पात्रांवरच अखेरपर्यंत लक्ष केंद्रित करण्यात आले आहे.

## (५) अरसिकेषु कवित्वनिवेदनम्

याप्रमाणे अनेक नाट्यमय प्रसंगांनी भरलेले हे आख्यान आहे. कथानिवेदनाच्या साक्षात्, प्रतिबिंब, अनुलोम व विलोम या ज्या चार पद्धती आहेत त्यांपैकी प्रतिबिंब व विलोम पद्धतींचा पंडित मेघाने उपयोग केला आहे. यातील कथा कवी स्वतः सांगत नसून त्यातील पात्रांकरवी त्याने ते काम पार पाडले आहे. कथेच्या अंताकडून उगमाकडे चाललो आहोत अशी तिची रचना आहे. चंडमारीच्या देवळात बलिदानासाठी उभा असलेला अभयरुची या काव्यग्रंथातील कथा मारिदत्तास सांगतो आहे अशी या काव्यग्रंथाची सुरुवात आहे. तो म्हणतो :

रावो जसोधरु आणि । चंद्रमति त्याची राणी
तेही पिठाचे कुकडे म्हणोनि । देविपूजा केली
तेणें पापेकरुणि । पावली दुःखाची खाणी
ते वृतांत तुं चित्त देउनि । परियसे राया

समाज पापभीरु झाला पाहिजे, जीवमात्रांना त्याने दुखविता कामा नये, या जगात आपणास जसे जिवंत राहावयाचे आहे तसे इतरांनाही, मग ते पशुपक्षी किंवा कीटक का असेनात, जगण्याचा अधिकार आहे याची त्यास विस्मृती होता कामा नये. व्रताचरणाकडे त्याचे अवधान असावे इत्यादी अनेक हेतूंनी जैनाचार्यांनी कथा लिहिल्या आहेत. असाच उदात्त हेतु बाळगून पंडित मेघाने जसोधराची कथा सांगितली आहे. ही धर्मकथा असल्याने ती सर्वांना आवडावी अशी त्याची अपेक्षा आहे. परंतु हे कलियुग आहे. सर्वांनाच धर्माची महती कशी कळणार ? 'हिंसा हे तर माझे जीवन' असे मानणाऱ्यांना ती कशी रुचणार ? अशांची उपेक्षा करताना कवी म्हणतो :

माझी कथा पाप नासती । केवळ धर्म्मातें भासती
तें तुम्हा हिंसकाप्रति । केंवि रुचे ?
न रुचे श्रोतयांते कथा । आणि वेलोवेलां सांगे वक्ता
वृथा घडे पीकलीया सेता । नीर जैसे

प्रसिद्ध महानुभावपंथी कवि भास्कर यानेदेखील शिशुपालवध कथा लिहिताना :

पुण वाचा रसाळा : गर्वु सांडवीन कोकिळां
कळहंसा अवकळा : करीन मी

अशी प्रतिज्ञा करून श्रीकृष्णकथेच्या रूपाने भक्तीची भागिरथीच पृथ्वीतलावर आणणार आहे असे आश्वासन दिले होते. मोक्षप्राप्तीचे साधन असलेली ही कथा देखील काही दोषैक दृष्टीच्या श्रोत्यांना आवडणार नाही याची त्यास खात्री होती. अशांचा अधिक्षेप करताना तो म्हणतो :

नावडी घेऊनि चंदनाचां रसीं ।
आंगामाजी खत पाहे मासी
तेवि गुण सांडौनि दोषु गिवसी : क्षुद्र जनु

पं. मेघाने देखील हीच कल्पना कशी मांडली आहे ती पहा :

मषिका चंदनु सांडिती । आणि आमिष स्वादिती
पय सांडौनि वोरपति । मूर्खजन पैं

– परंतु ही धर्मकथा असल्याने ती 'सकलागम्य' करण्याची पंडित मेघाची तळमळ आहे.

## (६) पंडित मेघाची अभिव्यक्ती

आख्यान असो, काव्य असो, कथा असो किंवा नाटक असो त्यात प्रामुख्याने दोन गोष्टींना महत्त्व असते. त्या म्हणजे काव्यात काय सांगितले आहे आणि ते कसे सांगितले आहे. यालाच मंत्र आणि तंत्र किंवा आशय आणि अभिव्यक्ती असे म्हणतात. कथेचा आशय आतापर्यंत स्पष्ट केलाच आहे. अभिव्यक्तीच्या दृष्टीने आपण आता जसोधरकथेकडे पाहणार आहोत.

चंडमारीच्या देवळातली क्रूरता पंडित मेघाने खालीलप्रमाणे चित्रित केली आहे. त्यायोगे एखादा प्रसंग दृष्टीपुढे हुबेहुब उभा करण्याचे त्याचे सामर्थ्य स्पष्ट होते :

मस्तकी जटा भरीतु । कानीं मुद्रा लोंबतु
गळां रुद्र लहकितु । रुंडमाला
रक्तवर्ण दीसेति बुबुलु । हातीं धरिला त्रिसुलु
मुख जैसा कालु– ।सारिखे देखा
दूजे हातीं वाजतीं घांघली । कोंपरीं घातली झोली
सेवकाकारणें बोली । भवसिंधु पैं
कंठी बांधली योगटी । कासे कसिली लंगोटी
आंगी घेतली भस्मउटी । डंबिये देखा

अमृतमतीचा भ्रष्टाचार उघडा पडल्यावर जसोधराचे मन संताप व पश्चाताप यांनी भरून गेले. त्याच्या त्या दग्धमनाचे प्रतिबिंब पंडित मेघाच्या खालील ओव्यातून आपणास पहावयास मिळेल.

पाहा रे संसाराची युक्ति । मी या देशाचा भूपति
अर्थभंडारादि संपत्ति। उणें नाही
आणि माझी हे अमृताराणी । रूपवंत सुकुलिनी
मातें वंचौनि पापिणी । कुबडा रातली
हें कुबडे क्रियाहीन । अवघ्यापरीस पाहता हीण
रक्त जाले रांडेचे मन । केंवि देखा
मरण चिंती मजकारणें । कुबडाची भक्ति करूं म्हणे
ऐसें रांडेचें करणें । विचित्र देखा



अनुक्रमणिका







'स्त्रियश्चरित्रं पुरुषस्य भाग्यम्' जाणणे कोणासही शक्य नाही. यशोधर राजाकडे काय कमी होते ? पण काममोहित व गानलुब्ध अमृताराणीला त्याचे काय ? काममोहित माणसे विवेक, वैभव, मान यांना पारखी झालेली असतात. यशोधराच्या बाहुपाशातून सुटका करवून घेऊन कुबडचा माहुताकडे चाललेल्या चंद्रमतीचे कवीने खालीलप्रमाणे वर्णन केले आहे :

मग ते अमृता पापिणी । राया निद्रा आली जाणौनि
भुजपंजरा-आंतौनी । निघती जाली
जैसी कांति होउनि सर्पिणी ।
अथवा खड्गदल्या आंतौनी
तैसी भुजपंजराहुनि । निघाली देखा

– आशय व्यक्त करताना तो अधिक स्पष्टपणे, अधिक सुंदरपणे व चांगल्या रीतीने प्रकट व्हावा अशी साऱ्याच कवींची धडपड असते. कात टाकून सर्पिणी निघावी किंवा म्यानातून तलवार बाहेर पडावी तशी अभिसरणार्थ बाहेर पडू इच्छिणारी अमृता जसोधराच्या भुजपंजरातून निघाली अशा मोजक्या शब्दात तिचे वर्णन केले आहे.

पाचशे स्त्रियांची परीक्षा पाहून जसोधराने निवडलेली अमृता साध्या कुबडचावर आसक्त झाली या घटनेने त्याच्या मनावर आघात झाला. एकंदर स्त्रीजातीविषयीच त्याचे प्रतिकूल मत झाले. ब्रह्मदेवालाही भ्रष्ट करणाऱ्या तिलोत्तमेपासून अमृतापर्यंतच्या अनेक भ्रष्ट स्त्रियांची नावे त्याला आठवली. पाण्याने वस्त्राचा रंग धुतला जावा त्याप्रमाणे वरील घटनेने जसोधराचा भ्रांतिरंग उडून गेला. या त्याच्या मन:स्थितीचे वर्णन करताना कवि म्हणतो :

भ्रांतिरंगु होता रायामनीं । तो उरंगला ऐसे देखोनि
जळें जैसें वस्त्र होऊनि । कोसंभ रंग

## ( ७ ) कथा सनातन पण पात्रे नित्यनूतन

यशोधराची कथा जैन पुराणातील असली तरी त्यातील घटना आणि पात्रे पाहिली तर ती आपणास नित्यनूतन व समाजाचे यथार्थ प्रतिबिंब दाखविणारी आहेत. प्रेमाचा वर्षाव करणारा पति–जसोधर–लाथाडून कुबडचा जाराने दिलेला त्रास अमृताराणीने सहजासहजी सहन केला. अभिसरणार्थ उशीर करून गेलेल्या राणीची,

मग तो केसिं धरी । मारी दोरी तोडी अंगावरी

अशी स्थिती केल्यावर व तिला माहुत साखळदंडाने मारीत असताही ती त्याला म्हणते :

'नको मारु गा प्राणनाथा । सीनु वाटैल तुझ्या हाता'

पती सोडून दुसऱ्यावर आसक्त झालेल्या स्त्रियांची सर्वत्र अशीच किंवा या स्वरूपाचीच उदाहरणे पहावयास मिळणार.

अमृताराणीची शीलभ्रष्टता पाहिल्यानंतर जसोधर वैतागला व तो दीक्षा घेण्यास निघाला. जारासह यथेच्छ कामक्रीडा करता यावी म्हणून अमृताराणीने मोठ्या कपटाने जसोधरास व त्याच्या आईस जेवावयास बोलाविले आणि विष पाजले. अर्धमेला होऊन पडलेल्या राजाच्या छातीवर अमृता बसली व तिने त्याचा गळा दाबून प्राण घेतला. या प्रसंगाचे मोजक्या शब्दात कवीने वर्णन केले आहे ते असे :

मग ते मोकला केसी । हृदयावरि बइसली कैसी
कुंजरावरि जैसी । सीहणी देखा
जैसा मुषकावरि बिडाली । की सर्पावरि नकुली
तैसी ती ते कुटिली । रायावरि देखा
जैसी वेउली अजावरी । किं कपोतावरि घारि
तैसी ती वैसली रायावरी । पापमूर्ति

– वरील वर्णन वाचताना जसोधरवधाचा प्रसंग पुन्हा साकार झाल्यासारखा वाटतो.

## ( ८ ) जसोधराची शोककथा

जसोधरासारख्या पराक्रमी पुरुषाची शोककथा पंडित मेघाने चित्रित केली आहे. शोककथेतील नायकाचे सर्व गुण त्याने जसोधरात दाखविले आहेत. पण त्याचे दुर्दैव असे की अमृतासारखी भ्रष्ट स्त्री त्याच्या जीवनात प्रवेश करते. तीच त्याच्या नाशाला व दुःखाला कारणीभूत होते. तिच्या कृत्याचे परिणाम ती भोगते हे निराळे. हा प्रसंग वर्णून अहिंसेचे श्रेष्ठत्व त्याने जसे दाखविले आहे तसेच जाता जाता अब्रह्माचा किंवा कुशीलाचा त्याला निषेध करावयाचा आहे. जसोधराच्या कथेची बैठक स्पष्ट करताना प्रस्तुत काव्यग्रंथाचे संपादक प्रा. अक्कोळे म्हणतात,

' हिंसा, असत्य, चोरी, अब्रह्म आणि अत्यधिक परिग्रह या पाच पापांपैकी हिंसा आणि अब्रह्म या दोन पापांची कटुफळे या कथेत दाखविली आहेत. शीलभ्रष्टतेमळे अमृता हीस नरकात जावे लागले. त्यामुळेच जसोधर विमनस्क होतो. त्याची खिन्नता दूर करण्यासाठी कुलाचारास बळी पडून आई चंद्रमती कुक्कुटबलीचा आग्रह धरते. शेवटी पिष्टकुक्कुटाचीही हिंसा इतकी भयंकर परिणामकारक होते की जसोधर-चंद्रमती या जीवांना अभयरुचि-अभयमतीचे जन्म मिळेपर्यंत सहा वेळा पशुयोनीत जन्म घेऊन दुःखच दुःख भोगावे लागते. कुलाचार-कुरूढी पाळणे हेही भयंकर पापदायी आहे."

## ( ९ ) रस-अलंकार इत्यादी

पंडित मेघाच्या अभिव्यक्तिकौशल्याची अनेक उदाहरणे आपल्याला पहावयास मिळतात. स्त्रीचे मुख कितीही आकर्षक असले तरी तिला थोडीतरी आभूषणे असल्याशिवाय ती सुंदर दिसत नाही. काव्यात इतर अनेक गुण असले तरी थोडेबहुत अलंकार देखील पाहिजेतच. पंडित मेघाने आपली कथा अलंकारांच्या साहाय्याने नटवून सांगितली आहे. उपमा, रूपक, विरोधाभास, स्वभावोक्ती इत्यादी अलंकारांची सुदर वर्णने ठिकठिकाणी पहावयास मिळतात. अभयरुचि व अभयमति यांचा पिता जसोमति याला विरक्ती झाल्यानंतर त्याने यतिधर्म स्वीकारू नये यासाठी त्याच्या राण्या विनंती करीत असल्याचा प्रसंग कवीने खालीलप्रमाणे वर्णिला आहे :

जैंसु सूर्याविनु कमलिनी । तरुविनु वेली जाणी
तैंसी पतिविन कामिणी । जाणिजो जी
तैंसी तुम्हाविनु राया । सोभे ना आमुचि काया
वैराग्यवासना वाया । धरिलासी तुम्ही
जैंसे चंद्रेविन रमणी । विवेकेविनु ज्ञानी
तैंसे तुम्हाविनु आम्हां जाणी । सोभा नाही
मानुस आणि धनेविनु । रूप आणि सीले विनु
धनिका आणि दानेविनु । सोभेजी ना
बलेविनु कुंजरु । विषविन विषधरु
न्यायेविन नृपवरु ।सोभा न पवे
जैसी बालका नाही माउली । आणि दुधेविनु गाउली
रंगेविनु बाहुली । सोभे जी ना

– यातील साऱ्याच उपमा अत्यंत हृद्य आहेत. परंतु रंगाशिवाय बाहुली शोभिवंत दिसत नाही ही उपमा तर अगदीच बहारीची आहे.

या काव्यात उत्कट रसवर्णनाची अनेक स्थाने आहेत. शृंगार, करुण, रौद्र, बीभत्स, शांत इत्यादी रसांची बहारदार वर्णने आहेत. वरील ओव्यात जसोमतीने दीक्षा घेण्याचे ठरविल्यावर त्याच्या राण्यांनी केलेला शोक आढळेल. यशोधर व अमृता यांच्या मीलनप्रसंगीचे शृंगारिक वर्णन कवीने खालीलप्रमाणे केले आहे :

मग राउ गेला भीतरीं । जेथे अमृतेची वोवरी
कर जोडौनि सुंदरी । उभी ठेली देखा
गोष्ठी करितां पैं लाजे । म्हणे धन्य जीवित्व माझें
येणे जालें राया तुझें । प्राणनाथा
जंव ऐसे बोले राणी । तंव रावो संतोषला मनीं
घंटानादु आइकौनी । कुरंगु जैसा

– तसेच चंडमारीच्या वर्णनात रौद्र रस, माहुताच्या वर्णनात बीभत्स रस, मारिदत्ताचे हृदयपरिवर्तन झाल्यानंतर केलेल्या वर्णनात शांत रसाची प्रतीति येते.

## (१०) पंडित कवि मेघा

मेघा जसा कवी होता तसाच तो पंडित होता. जैन शास्त्रांचे त्याने सखोल अध्ययन केले होते. प्रस्तुत धर्मकथेच्या द्वारा त्याने गृहस्थधर्म, यतिधर्म, आणि आत्मा यांची स्वरूपे अत्यंत सोप्या भाषेत स्पष्ट केली आहेत. शरीर व आत्मा या दोन्ही गोष्टी तर भिन्न आहेतच. पण संसारामध्ये आत्म्याचा आकार कसा असतो यासंबंधी तो म्हणतो :

पाषाणी सोनें व्यापिलें । तील व्यापिलें तेलें
तैंसे देह व्यापिलें । आत्मतत्त्वें देखा
जैंसे फुल व्यापिलें परिमलें । ते फुलाहोऊनि वेगले
तैंसे जीवतत्त्व निर्मलें । देहभिन्न

– गृहस्थाने स्वशांतीसाठी व सौख्यासाठी अत्यंत शुद्ध आचरण ठेवले पाहिजे यावर तो भर देतो. जुगार, मांसभक्षण, मद्यपान, वेश्यागमन, चौर्य, परस्त्रीसेवन यायोगे संसार उध्वस्त होतो. देवपूजन, गुरूची उपासना, धार्मिक ग्रंथांचा अभ्यास, संयम, तप, दान या गोष्टी त्याला सौख्य मिळवून देणाऱ्या

आहेत. पण हे सर्व वर्णन करीत असताना हिंसेमुळे भोगावा लागणारा त्रास आणि अहिंसेचे महत्त्व याकडे तो अजिबात दुर्लक्ष करीत नाही. तो पुन्हा पुन्हा हेच सांगतो :

याकारणें भव्य जीवीं । सर्वथा दया पालावी
तें कर्में टालावीं । जेणें हिंसा घडे
आपल्या हातीं न कीजे । पुढीलकरवीं न करविजे
करिता देखौनि नानिजे । हरिषु मनीं
तैसे जीवघातु करिता । हित नव्हे गा मारुदत्ता
अरंडदांडु पिलिता । जैसा रस नव्हे

– इतके असूनही मांसभक्षण करू पाहणाऱ्या मूर्खांचा अधिक्षेप करताना तो म्हणतो :

पुढीलांचा घातु करिती । आणि त्यांचे मांस स्वादिती
त्याहोउनी माहार भले जे खाती । मेलयावरि

– पं. मेघा जैन-धर्मीय कवी होता. त्या धर्मात सांगितलेल्या अहिंसा, सत्य, अचौर्य, ब्रह्मचर्य, आणि अपरिग्रह या तत्त्वांचे जीवनातील महत्त्व त्याने सांगितले आहेच. पण त्यातल्या त्यात अहिंसा आणि ब्रह्मचर्य यांवर त्याने अधिक भर दिला आहे. संसाराची व जीवनाची स्थिरता वरील तत्त्वांच्या अधिष्ठानावरच असल्याने ती ज्या धर्मात सांगितली आहेत त्या जैन धर्माचे अनुसरण करणे अगत्याचे आहे असे तो म्हणतो,

आतां जैनधर्मु धरी । व्रतेंविधानें आचरी
त्याविन सवंसारी । सुटिका नाही

– देव आणि राक्षस यांची व्याख्या करताना विनोबा, ' देतो तो देव आणि राखतो तो राक्षस ' अशी सुटसुटीत व्याख्या करतात. पापपुण्याची व्याख्या करताना पं. मेघाही म्हणतो :

पुण्य होय जिउ पालिता । पाप होय जिउ मारिता
पापपुन्याची वेवस्ता । या दोघामांजी

## ( ११ ) नेनु मी मऱ्हाटे बोलणे

११६४ ओव्यांचे हे दीर्घ काव्य लिहूनही ही महाकथा आपल्यासारख्या अल्पबुद्धीच्या कवीकडून कशी लिहिली जाणार याविषयी भीती व्यक्त केली आहे. तो म्हणतो :

जंव बोलुं पाहे रसनि । भय उपजत असे मनीं
धर्मकथा माझेनि । सांगवे केंवि ?

– यशोधराची कथा तशी प्राचीन असल्याने ती संस्कृत, प्राकृतादी भाषात अनेक जैन कवींनी समर्थपणे चित्रित केली आहे. त्यांच्याशी तुलना करता आपले काव्य हिणकस ठरेल अशी लीनतेची भावना तो व्यक्त करतो.

प्रमाण तेज सूर्याचें । अथवा तेज दीपकाचें
त्या जवलि काजवाचें । केन मात्र
सूर्य जैसे जिनवरु । दीपक जैसे मुनिवरु
काजव जैसे मी नरु । बुद्धिहीणु

– मराठी भाषेवर अत्यंत प्रभुत्व असूनही आणि काव्यरचना-सामर्थ्याविषयी प्रचंड आत्मविश्वास असूनही केवळ विनयाने आपल्याकडे लघुत्व घेऊन कवि म्हणतो :

नेनु मी मऱ्हाटे बोलणें । नेनु मी वोवीचे बंधने
अक्षर होय अदिक उणे । ते नैनवें मज

– या आख्यानकाव्याच्या रूपाने धर्मकथा सांगून सरस्वतीची सेवा केली याचा त्याला झालेला आनंद मात्र तो लपवू शकला नाही. तो म्हणतो :

ऐसा केला अनुवादु । तंव मज घडला आनंदु
जैसा पडला मेघबिंदु । चातकामुखी

## ( १२ ) अपेक्षा

याप्रमाणे पंडित मेघाने धर्माचे, अहिंसेचे महत्त्व बिंबविण्यासाठी जसोधराचे आख्यान मराठीत लिहिले आहे. या आख्यानाचा परिचय करून देणारी ७५ पानांची विस्तृत प्रस्तावना संपादकाने जोडली आहे. शेवटी अर्थबोधक टीपा दिल्या असून छोटासा शब्दकोशही जोडला आहे. अत्यंत परिश्रम घेऊन संपादिलेल्या या जुन्या काव्याचे महत्त्व महाराष्ट्रातील विद्यार्थी, प्राध्यापक, टीकाकार आणि रसिक जाणतील आणि प्रा. अक्कोळे यांच्या श्रमांचे योग्य चीज करतील अशी आशा आहे. मराठीचा एक अभ्यासू विद्यार्थी म्हणून रसिकांना मी हे आवाहन करीत आहे. अज्ञात असलेले हे काव्य प्रा. अक्कोळेंनी रसिकांपुढे ठेवले आहे. यापुढचे काम साहित्यभक्त रसिकांचे आहे.

श्री. मो. वि. पटवर्धन

# "वर्ण" नव दृष्टिकोन

हिंदुसमाजाचे मूलतः समाजरचनेचे वेळी जे चार वर्ग–ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र असे–पाडले जातात त्यास 'वर्ण' असे म्हणतात. ह्या वर्ण शब्दाची जी पाश्चिमात्यांनी व्युत्पत्ती दिली आहे ती अशीः वर्ण या शब्दाची मूळव्युत्पत्ती रंग अशी आहे. आर्य या नावाची गौरवर्ण वांशिक टोळी हिंदुस्थानच्या उत्तरेकडील प्रदेशातून इसवी सन पूर्व १५०० शे चे सुमारास या देशात शिरली. त्या वेळेस द्राविडीयन या काळ्या वंशाचे एतद्देशीय लोकांशी त्यांचा संघर्ष झाला. या संघर्षात गोरा आर्यवंश विजयी झाला व त्यांनी काळ्या द्राविडीयन लोकांना आपले दास किंवा गुलाम बनविले गोरे आर्य आपणास द्विज अगर त्रैवर्णिक म्हणत व काळ्या द्राविडियन दास व दस्यू लोकांना शूद्र म्हणत. या द्राविडियन शूद्रांना वेद म्हणण्याचा अधिकार नव्हता व त्यांना अत्यंत कमी दर्जाचे लेखले जाई. हा आर्य व आर्येतर द्रविड लोक याच्यातील फरक गौरवर्ण व कृष्णवर्ण यावर अवलंबून असल्याने या प्रक्रियेस 'वर्ण' अशी संज्ञा मिळाली. व अशा तऱ्हेने 'वर्ण' हा शब्द अस्तित्वात आला. पाश्चिमात्यांची 'वर्ण' या शब्दाची ही व्युत्पत्ती जर खरी असेल तर 'वर्ण' हा शब्द व ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे वर्ग आर्यवंश हिंदुस्थानात आल्यानंतर उत्पन्न झाल्याने, आर्य हिंदुस्थानात येण्याच्या अगोदर ते ज्या इंडोयुरोपियन व इराणी या मुख्य टोळीपासून वेगळे झाले त्या टोळ्या मध्ये वरील शब्द अगर वर्ग असणे अशक्य होय. पण या टोळयात हे वर्ग सापडत असल्याने परिस्थिती या वरील वर्णनाच्या सर्वस्वी विरुद्ध आहे. (१) इराणी लोकाच्या धर्मग्रंथात (अवेस्ता) ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र या अर्थी अथ्रवण्, रथडाश्य, वस्रोक्षुयांश व हुईतिश हे शब्द आढळतात (अवेस्ता यस्त्र १९–१७)

एवढेच नव्हे तर वर्ण या अर्थी 'वेरेना' हा शब्दही आढळतो (अवेस्ता यस्त्र ४५-१; ४५·२; ४८-४; ४९-३; या 'वेरेना' शब्दाचा अर्थ 'वर्ण' असा बार्तलोमो अलटीरानिश वोरतेरवुश या अवेस्ता शब्दकोशकाराने दिला आहे. (वीसतुश-यश्ट ५०; वेनीडाड १८–६४). तेथे 'वरेना' हा शब्द वृ: to choose या धातूपासून निघाला आहे असे म्हटले आहे. तसेच (२) प्राचीन ग्रीस देशातील इण्डो युरोपियन या मूळ आर्यन लोकविभागातही ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र या अर्थी वर्ग सापडतातः व त्यांची नावे गेलीऑण्टिस, होपलेटीस, एजोकोरिस व आरगाडीस अशी होती. हे वर्ग क्रीसथेनीस (५०९ खिस्तपूर्व) च्या वेळेपर्यंत आटीका प्रदेशात होते. (सर वीलीयम स्मिथ; हा हिस्टरी ऑफ ग्रीस फ्रॉम दी अर्लीएस्ट टाईम्स टू दी रोमन कॉंकेस्ट पान ९६. Sir. W. S. Smith; A History of Greece from the earliest times to The Roman conquest page 96) यावरून पाश्चिमात्यांची विचारसरणी सर्वस्वी चूक आहे हे सिद्ध होते.

तसेच या विचारसरणीस आधार म्हणून पाश्चिमात्य असे प्रतिपादन करतात की ऋग्वेदाच्या जुन्या भागात म्हणजे मंडल १ ते ९ मध्ये ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांचा एकत्रित उल्लेख येत नसून तो उल्लेख मात्र दहाव्या मंडलातच किंवा त्यानंतरच्या धर्मग्रंथात येतो. ऋग्वेदाचे दहावे मंडल हे ऋग्वेदाचे इतर मंडलांच्या मानाने बरेच अर्वाचीन आहे असे सर्व विद्वानांचे मत आहे, यावरून पाश्चिमात्य विद्वान असे प्रतिपादन करतात की ही समाजाची विभागणी आर्य हिंदुस्थानात आल्यानंतर व त्यांचा द्राविडियन लोकाशी संघर्ष होऊन त्यांचा पराभव झाल्यानंतर केव्हातरी झाली असावी. ही त्यांची विचारसरणीही चूक आहे हे वेदातील आधारानेही दाखविता येते. पाश्चिमात्य दृष्टिकोनातून पाहिल्यास खरे म्हणजे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य ही नावेही ऋग्वेदाच्या जुन्या भागात असून उपयोगाची नाहीत. पण तसे नाही. (१) हे निरनिराळे वर्ग ऋग्वेदात सापडतात. ब्राह्मण, हा वर्ग याअर्थी शब्द, ऋग्वेद ७·१०३–७; ७·१०३–८; १०·१६–६; १०·७१–८; क्षत्रिय हा शब्द वर्ग या अर्थाने ऋग्वेद, ४·४२–१; १०·१०९–३; ७·६४–२ ८·२५–८; ८·६७–१; अथर्ववेद ५·१७–३; व राजन्य म्हणून ५·१७–९; वैश्य याअर्थी ऋग्वेद पुरुषसूक्त १०–९० मध्येच असला तरी विश् याअर्थी








ऋग्वेद ३·५–३; ३·६–३; ३·११–५; ४·६–७; वगैरे ठिकाणी सापडतो. ब्राह्मण व क्षत्रिय असा एकत्रित उल्लेख ऋग्वेद १·१५७–२; अथर्ववेद ३·१९–१; २·१५–४; ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य असे जवळ उल्लेख: ऋग्वेद ८·३५–१६, १७, १८; यात मिळतात. पण या सर्व वर्गांची कर्तव्ये, एकत्रित वर्णन असलेलीही, ऋग्वेदात सापडतात (ऋग्वेद १·११३-६). या सर्वांवरून ऋग्वेदाचे जुने भागाचे वेळीही ही कल्पना अस्तित्वात होती हे स्पष्ट होते.

तसेच ऋग्वेदात आर्य व दास व दस्यू यांचे संघर्ष जसे वर्णिले आहेत, ( ऋग्वेद १·५१-८; १·१०३-३; १·१७१-२१; २·११·२-४; ३·२९-९ वगैरे ), तसेच आर्या-आर्यांमध्येही युद्धे झालेली दिसतात: ( ऋग्वेद ६·६०-६; ७·८३–१; ६·२२-१०; १०·६९-६; १०,८३-१; १०,१०२-३) यावरून आर्यांचे शत्रू फक्त दास व दस्यू एवढेच होते असे नाही तर आर्यांपैकीही काही शत्रू होते हे सिद्ध होते.

तसेच काही ठिकाणी आर्यांना, आर्य व दास व दस्यू यांच्या एकत्रित संघटनेबरोबरही युद्ध करावे लागले ( ऋग्वेद ६·३३–६; ६·६०–६; १०·३८–३; १०·८३–१; १०·१०२–३. ) यावरून आर्य व दास आणि दस्यू हे नेहमीचे शत्रू होते असे दिसत नाही.

काही वेळा आर्य व दस्यू यांनी एकत्रित येऊन समान शत्रूंचा मोड केला असे दिसते (ऋग्वेद ६·३३·३; ७·८३·१; १०·१०२·३ )

तसेच काही विधानांवरून दास, दस्यू, आर्य हे एकाच समाजाचे घटक असून त्याना निरनिराळे करण्याचे काहीतरी परिमाण होते हे सिद्ध होते ( ऋग्वेद १·५१·८; १०,८६·१९ )

काही वेळा दास, व दस्यू यांनाही परमेश्वरी कृपेने आर्य होता येत असे ( ऋग्वेद ६·२२·४ ).

ऋग्वेदातील प्रसिद्ध दाशराज्ञ युद्ध हे आर्य व आर्य यांच्यामध्येच होते. वर्ण याचा अर्थ रंग असा केल्यास वैदिक धर्मशास्त्राचा सुसंगत अर्थ करता येत नाही हासुद्धा यातील मोठा दोष आहे. महामहोपाध्याय काणे यांसारख्या विद्वानांनासुद्धा अत्यंत परिश्रम घेऊन हिंदुधर्मशास्त्रातून वर्ण याशब्दाचा अर्थ रंग घेतल्याने काही उपयोगी निष्कर्ष काढता आलेले नाहीत.

ऋग्वेदात आर्य हा शब्द 'आर्य' या स्वरूपात सुमारे छत्तीसवेळा व 'अर्य' या स्वरूपात अठ्याऐंशी वेळा आलेला आहे व त्याचा अर्थ 'शत्रू' "संभावित गृहस्थ" 'धनी' 'वैश्य अगर नागरिक' असा आहे. पण ऋग्वेदातील अर्य व आर्य हे सर्व उल्लेख घेतले तरी ऋग्वेदात असा एकही मंत्र नाही की ज्या ठिकाणी त्याचा अर्थ 'वंश' असा करता येईल. – ( महाराष्ट्रीय ज्ञानकोश; प्रस्तावना खंड; भाग तिसरा; पान २९ )

यातच नंतर पाश्चिमात्यांच्या दुर्दैवाने असे दिसून आले की आर्य किंवा द्राविडीयन हे 'वंश' नसून भाषासंघ आहेत. वंशात व भाषासंघात हा फरक आहे की वंशात एकाच वर्णाचे लोक सापडतात. पण भाषासंघ निरनिराळया वर्णाचे मिळूनही होऊ शकतात. आर्य मानवाचा शुद्ध गौरवंश शोधून काढण्याची पाश्चिमात्यांनी फारच खटपट केली. पण अद्याप त्यांना असा वंश सापडलेला नाही. तेव्हा वरील विवेचन थोडे बदलून त्यांनी द्राविडीयन यांचेऐवजी काळा आस्ट्रेलाईड नावाचा उपलब्ध होणाऱ्या वंशाची अदलाबदल करून या विवेचनास शास्त्रीय स्वरूप देण्याचा प्रयत्न केला. पण मुख्य आर्य नावाचा वंशच उपलब्ध होऊ न शकलेने ही सर्व खटपट फुकट ठरली व या विवेचनास काही मान्यवर पाश्चात्य विद्वानांनीच हरकत घेतली. यातील मॅक्समुलर या प्रसिद्ध विद्वानाचे मत निर्णायक आहे. तो म्हणतो "आर्यन या नावाचा शुद्ध रक्ताचा वंश कोठेही नाही; आर्यन हा शब्द शास्त्रीय दृष्ट्या वंश या अर्थी वापरता येणे कदापि शक्य नाही, त्याचा अर्थ भाषा येवढाच होतो. जेव्हा आम्ही आर्यवंश म्हणतो तेव्हा त्याचा अर्थ भाषासंघ असाच होतो. मी वरचेवर प्रतिपादले आहे की मी जेव्हा 'आर्य' हा शब्द उच्चारतो तेव्हा त्याचा अर्थ रक्त, अस्ति, कवटी किंवा केस असा नसून त्याचा स्पष्ट अर्थ आर्यन भाषा बोलणारे लोक असाच आहे. हा शब्दप्रयोग कठोर वाटेल. पण अशा महत्वाचे बाबतीत आपले शब्दप्रयोग स्पष्ट पाहिजेत. माझ्या दृष्टीने जेव्हा एखादा वंशशास्त्रज्ञ आर्यन वंश, आर्यन रक्त, किंवा आर्यन केस व डोळे असा उल्लेख करतो, तेव्हा तो डॉलीको केफॅलीक ( अरुंद डोके ) शब्दकोश किंवा ब्रॅकीकेफॅलिक ( गोल डोके ) व्याकरण असा शब्दप्रयोग करणाऱ्या भाषाशास्त्रज्ञाइतकाच प्रमादशील आहे. ही बाबीलोनियन वावदूकतेइतकी दोषार्ह बाब आहे. ही शुद्ध चोरी










आहे. आमची भाषाशास्त्राची परिभाषा ठरलेली आहे. वंशशास्त्रज्ञांना रक्त, केस व कवट्या याबद्दल त्यांची परिभाषा ठरवू दे. ( Max muller Biography of words page 89 and 120–121; quoted by B. R. Ambedkar; who were the S'udras page 61 ).

या निर्णायक महत्वाच्या प्रतिपादनानंतर पाश्चिमात्य विद्वानांनी आपले मत प्रस्थापनेकरिता निराळी क्लृप्ती काढली. हिंदुस्थानीतील निरनिराळ्या जातीचे वंश-दृष्ट्या शीर्षमापन व नासिकामापन निर्देशांक काढून त्यावरून त्यांनी वरील निष्कर्षास शास्त्रीय बैठक देण्याचा प्रयत्न केला. यांत रिसले, थर्स्टर्न इत्यादी विद्वानांनी भाग घेतला. पण यातही सर्व निष्कर्ष जवळजवळ विरुद्धच निघाले. प्रथम उत्तरेकडील ब्राह्मण व दक्षिणेकडील ब्राह्मण यांच्यात स्पष्ट फरक दिसत होताच. याकरिता एकाच प्रांतातील निरनिराळ्या जातींचे शीर्षमापन निर्देशांक काढण्यात आले. पण तेथेही ब्राह्मण व महार यांचे निर्देशांक जवळ-जवळ एक आल्याने हाही प्रयत्न फुकट ठरला. याप्रमाणे सर्व वरील प्रतिपादनाचा सारांश काढला तर असे दिसून येईल की ' वर्ण ' या शब्दाची पाश्चिमात्यांनी मांडलेली जी विचारसरणी आहे व जीवर अद्यापही सर्व पाश्चिमात्य दृष्टिकोणाचे विद्वान अवलंबून आहेत, ती सर्वस्वी चूक व संपूर्णपणे अ-शास्त्रीय आहे. ती जितक्या लवकर आपण संपूर्णपणे टाकून देऊन तिच्या ऐवजी शास्त्रशुद्ध विचारसरणीचा अंगीकार करू तितके बरे व असे केले तरच आपल्या धर्मशास्त्राचा आपणास खरा अर्थ समजेल. पाश्चिमात्य अशास्त्रीय विचारसरणी अनुसरल्यास जगाच्या अंता-पर्यंतसुद्धा आपणास आपल्या धर्मशास्त्राचा खरा उलगडा होणार नाही.

( २ )

## वर्ण शब्दाचा खरा अर्थ

वर्ण या शब्दाचा शब्दकोशातील अर्थ रंग असा जरी आहे तरी त्याचा दुसरा अर्थ ' वर्णन करणे ' अगर ' वर्णन ' असाही आहे. शिवाय ' वर्ण ' हा शब्द ' वृ ' ' निवडणे ' अगर ' बंधन घालणे ' ह्या धातूपासून निघाला आहे असे गृहीत धरल्यास त्याचा तोही अर्थ होऊ शकेल. आपल्या भाषेत जी ५२ अक्षरे आहेत त्यानाही वर्णमाला म्हणजे 'वर्णाची माळ' असे म्हटले आहे. या दृष्टीने ' वर्ण ' या शब्दाचा अर्थ लावणेही शक्य आहे. आपल्या भाषेतील निर-निराळ्या अक्षरांचे ध्वनी निसर्गात आहेत व त्यांना एकमेकापासून निराळे ठरविण्यास त्या प्रत्येकास आपण निरनिराळी नामे दिलेली आहेत. उदाहरणार्थ 'अ' या ध्वनीस आपण ' अ ' हे नाव देतो. आता कोणी ' अ ' या ध्वनीस ' अ ' हेच नाव का द्यावे ' आ ' का म्हणू नये, असे विचारल्यास त्यास आपणास एवढेच सांगता येते की याप्रमाणे काहीतरी मूलभूत कल्पना सर्वांनी गृहीत धरल्याशिवाय भाषाच अस्तित्वात येणार नाही. यावरून ' वर्ण ' या शब्दाचा अर्थ म्हणजे भाषा अस्तित्वात येण्याकरिता केलेली मूलभूत कल्पना असा होतो व असे केल्याशिवाय भाषाच अस्तित्वात येत नाही. हीच कल्पना समाजास लावल्यास त्याचा अर्थ ' समाज अस्तित्वात यावयास करावी लागणारी मूलभूत कल्पना म्हणजे वर्ण, असा होईल. म्हणजे समाजव्यवस्था करावयाची असल्यास वर्णव्यवस्थेप्रमाणे प्रत्येक समाजाचे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र असे मूलभूत वर्ग पाडल्याशिवाय कोणतीही समाज व्यवस्था होऊच शकत नाही असा होतो. यावरून कोणताही समाज कार्यान्वित झाला की त्यात–त्याची इच्छा असो वा नसो–ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे भाग आपोआप पड-तात. त्याशिवाय समाजव्यवस्थाच होऊ शकत नाही. याचा अर्थ " वर्ण " हे परमेश्वर निर्मित किंवा ज्यांचा परमेश्वरावर विश्वास नाही त्यांचे दृष्टीने निसर्गनिर्मित आहेत असे म्हणावे लागते. यावरून कोणताही मानव-समूह कार्यक्षम होऊन ' समाज ' या नामाभिधानास पात्र झाला की त्यात ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र असे भाग कोणत्याही परिस्थितीत पडतातच. त्याशिवाय समाज कार्यच करू शकत नाही.

प्रत्येक समाज कार्यान्वित झाला की त्यात चार भाग पडतातच या वस्तुस्थितीस शास्त्रीय सिद्धान्ताचीही जोड देऊन ती सिद्ध करता येते. तो शास्त्रीय सिद्धान्त असा–

## कार्याचा सिद्धान्त ( Law of Action )

( १ ) या विश्वातील प्रत्येक वस्तू दोन अवस्थेत उपलब्ध होते : ( अ ) विश्रांतिमय व ( ब ) कार्यमय.








(२) विश्रांतिमय अवस्थेत वस्तूची अवस्था काय असते हे जरी सांगणे शक्य होत नाही तरी प्रत्येक वस्तू कार्यमय झाली की तिचे तीन भाग पडतात : (अ) कार्य करणारी शक्ती जेथे लागू होते तो भाग (S = souree) (ब) जेथे प्रत्यक्ष कार्य घडते तो भाग (A = action) (क) व या दोहोंना जोडणारा भाग (L = link).

(३) थोडा खोल विचार केल्यास आपणास दिसून येते की 'L' म्हणजे ज़ोडणाऱ्या भागाचेही खरे दोन भाग पडतात : (अ) जेथे शक्ति कार्य करते असे वाटते त्या जागेपासून त्या पदार्थाच्या मध्यबिंदूपर्यंत (Center of Gravity) जाणारा एक भाग ($L_1$) व (ब) मध्यबिंदूपासून जेथे कार्य प्रत्यक्ष घडून येते तेथपर्यंतचा दुसरा भाग ($L_2$). यातील $L_1$ चा मुख्य गुणधर्म चपलता (activity) हा आहे, कारण त्यास शक्ती बाहेरून मध्यबिंदूपर्यंत पोचविता आली पाहिजे व $L_2$ चा मुख्यगुणधर्म शक्ती हा असला पाहिजे कारण तसा तो नसल्यास शक्तीस मध्यबिंदूपासून बाहेर जाऊन कार्य करताच येणार नाही. यावरून प्रत्येक वस्तू कार्यमय झाली की त्यांत S–L1– $L_2$–A हे चार भाग असलेच पाहिजेत. त्याशिवाय कार्य होणारच नाही असा होतो.

(४) जड वस्तूत S-$L_1$–$L_2$–A हे अनुक्रमे मध्यबिंदू-चपलता-शक्ति-कार्य घडून येणारा भाग असे असतात. जिवंत वस्तूत किंवा प्राण्यांत S–L1–L2–A हे अनुक्रमे मेंदू-मज्जातंतू-स्नायुरचना व कार्य करणारे इंद्रिय असा होईल.

(५) समाजाचे S-$L_1$-$L_2$–A म्हणजेच ब्राह्मण, वैश्य, क्षत्रिय व शूद्र होत.

यावरून समाज कार्यान्वित झाला की त्याचे चार भाग आपोआप पडतात ही कल्पना शास्त्रीय सिद्धांतानेही सिद्ध करता येणे शक्य आहे हे स्पष्ट होईल.

हा तात्विक "कार्याचा सिद्धान्त" आपण ज्यावेळेस पेन्सील घेऊन लिहू लागतो किंवा खेळात गोल करण्यास फुटबॉलला लाथ मारतो त्यावेळेस प्रत्यक्षात संपूर्णपणे बरोबर आहे असे दाखविता येते. तसेच प्रत्येक कार्यमय वस्तूची अंतर्गत व्यवस्था चार भागात कशी होते या चीही आपणास कल्पना करता येते तसेच निसर्गात उपलब्ध होणाऱ्या कार्यमय वस्तूची छाननी केल्यासही वरील सिद्धान्त बरोबर असल्याचा पडताळा येतो. उदाहरणार्थ, विश्वातील प्रत्येक वस्तूत असंख्य 'अणु' (Atom) असतात. हे सर्व अणू नेहमी कार्यान्वित असतात. या अणूच्या अंतर्गत व्यवस्थेकडे लक्ष दिल्यास 'कार्याचा सिद्धान्त' बरोबर असल्याचे दिसून येते. हैड्रोजन अणूत मध्यवर्ती एक न्यूक्लीअस प्रोटानचा बनलेला असतो. हाच त्याचा 'S' होय. त्याच्या बाह्य परिघात एक 'इलेक्ट्रॉन' वर्तुळात फिरत असल्याने तेथे कार्य घडून येते म्हणून तो त्याचा 'A' होय. तसेच अणूंच्या हायसेनबर्गच्या "प्रिन्सिपल आफ इनडिटरमिनन्सी" (Principle of Indeterminancy) प्रमाणे "कार्यमय इलेक्ट्रॉनचे मापन 'कण' म्हणून तरी करता येते अथवा 'तरंग' म्हणून करता येईल, कण व तरंग यांचा समन्वय करून मापन करता येणार नाही" या नियमाप्रमाणे अणूमध्ये 'कण' म्हणजे 'शक्ति' व 'तरंग' म्हणजे 'चपलता' ह्या दोन्हींचे अस्तित्व असते हे सिद्ध होते. यावरून अणूचे बाबतीत "कार्याचा सिद्धान्त" बरोबर असल्यास पडताळा संपूर्णपणे मिळतो.

तसेच आधुनिक अणू पदार्थविज्ञानशास्त्राप्रमाणे "दृश्य विश्व उभारणी रचना समीकरण" (World building relation structure equation) मांडले जाते त्यात चारच मुख्य बिंदू (co-ordinates) धरावे लागतात. तीन अगर पाच घेता येत नाहीत (A. S. Eddington; The Nature of the Physical World; Page 230-231). यावरून प्रत्येक वस्तू कार्यमय झाल्याबरोबर त्याचे आपोआप चार भाग पडतात या "कार्याच्या सिद्धांतास" पुष्टी मिळते. तसेच पुरुषाचा रेतबिंदू व स्त्रीचे "स्त्रीबीज" याच्या मीलनापासून प्रथम झायगोट (zygote) व नंतर मोरुला (morula) असा बुंदीच्या लाडूसारखा दिसणारा पदार्थ तयार होतो. याचेपासून शरीरातील निरनिराळे अवयव तयार होणेचे अगोदर त्या पदार्थाचे तीन भाग पडतात. (१) एक्टोडर्म (ectoderm) यापासून मेंदू व चामडी तयार होते (S) (२) एनटोडर्म (Entoderm) यापासून आतडीचे फुफ्फुसादी इतर अवयवांची अंतःत्वचा उत्पन्न होते. यातूनच अन्नरस व हवेतील आक्सीजन यांचे शोषण होते.



अनुक्रमणिका






( A ). तिसरा भाग मेसोर्डम ( mesoderm ) हा होय. यापासून रक्त, रस ( $L_1$ अगर चपलता ) व अस्थि, मांस, मेद ( $L_2$ अगर शक्ति) दुसरे शरीराचे भाग तयार होतात. यावरून तेथेही S. $L_1$-$L_2$-A हे भाग तयार होतात हे दिसून येईल.

या व इतर बऱ्याच आधारावरून 'कार्याचा सिद्धान्त' हा तात्विक व प्रत्यक्ष या दोन्ही दृष्टया बरोबर आहे असे सिद्ध होते.

आता ' समाज ' म्हणजे " समान ध्येय व हित साधण्याकरिता एकत्रित येऊन कार्यमय होणारा मानव-समूह " होय. यावरून प्रत्येक कार्यक्षम समाज हा नेहमी कार्यमय असतो व म्हणून "कार्याच्या सिद्धांता" प्रमाणे त्याचे चार भाग पडल्याशिवाय त्याचे कार्यच चालू होत नाही. यात्र विभागांना ब्राह्मण ( मेंदू ), क्षत्रिय ( शक्ति ), वैश्य ( चपलता ) व शूद्र ( प्रत्यक्ष कार्य करणारा भाग ) असे नामाभिधान आहे.

आता हा नियम जर खरा व परमेश्वर निर्मित असेल तर जगातील सर्व समाजात ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे भाग आढळून आले पाहिजेत. जगातील सर्व समाजाकडे थोडे विचारपूर्वक पाहिल्यास हे वर्ग प्रत्येक समाजात दिसून येतील. अमेरिकन संस्थाने, ब्रिटन आदी पाश्चिमात्य भांडवलशाही राष्ट्रात पुरोहित, राज्यकर्ते, व्यापारी व मजूर हे वर्ग सर्वत्र दिसून येतात. इतर रानटी समाजातही हे वर्ग नेहमी आढळून येतात. रशिया चीन आदी काम्युनिस्टिक राजवटीतील पुरोहित म्हणजे तेथे प्रस्थापित झालेल्या मार्क्सवादाचे नियम कोणते आहेत हे सर्व समाजास सांगणारी काम्युनिक्टिक पार्टी होय. यावरून जगातील प्रत्येक समाजात ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे भाग नेहमी न चुकता उपलब्ध होतात. किंबहुना थोडे पुढे जाऊन आपणास असे प्रतिपादन करता येईल की जगातील कोणत्याही जिवंत समाजात चार वर्गापेक्षा कमी वर्ग केव्हाही सापडणार नाहीत.

आपल्या धर्मशास्त्राकडे दृष्टीक्षेप केल्यास बरोबर याच अर्थाने " वर्ण " हा शब्द नेहमी वापरलेला दिसून येतो. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांचा एकत्रित उल्लेख प्रथम ज्या ऋग्वेदातील पुरुषसूक्तात येतो ( ऋग्वेद मंडल १०–९० ) त्यावेळेस त्यांची उत्पत्ति सूर्य, चंद्र, दिशा, यांचेबरोबर वर्णिलेली आहे. सूर्य, चंद्र दिशा हे परमेश्वर निर्मित असल्याने ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांची निर्मितीही परमश्वेरेच्छेने आहे असे ठासून प्रतिपादन करता येईल. हेच पुरुषसूक्त शुक्ल यजुर्वेद वाजसनेयी संहितेत ( ३१ ) व अथर्ववेदांत (१९-६) दिले आहे.

तसेच शुक्ल यजुर्वेद वाजसनेयी संहिता ( १४,२८–२९–३० ) यात व शतपथ ब्राह्मण (१४–४–२–२३, २४,२५ ) यात ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांची उत्पत्ती परमेश्वरनिर्मित आहे असे विधान आहे.

ऋग्वेदातही वर्ण हा शब्द बऱ्याच वेळेला आलेला आहे व त्याठिकाणी त्यांचा अर्थ रंग किंवा प्रभा असाच साधारणपणे आहे पण एके ठिकाणी मात्र त्याचा अर्थ ' वर्ग ' असाच केल्याशिवाय गत्यंतर नाही. ( ऋग्वेद १,१७९–६ )

भगवद्गीतेत तर चातुर्वर्ण्य मीच उत्पन्न केलेले आहे, त्याला उत्पन्न करणे अगर नाहीसे करणे हे मलाच शक्य आहे असे श्री. श्रीकृष्ण परमात्म्याचे स्पष्ट विधान आहे ( भगवद्गीता ४-१३ )

महाभारत, रामायण, पुराणे व इतर धर्मग्रंथ यात वर्ण हा शब्द सामाजिक दृष्टया जेथे आला आहे त्या सर्व ठिकाणी त्याचा अर्थ परमेश्वर निर्मित ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र वर्ण असाच आहे.

अत्यंत महत्त्वाचा आधार म्हणजे ' वर्ण ' या शब्दाचा वर दिलेला अर्थ मीमांसाशास्त्राला धरून आहे.

यावरून ' वर्ण ' म्हणजे " समाजव्यवस्थेसाठी समाजाचे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र असे चारभाग पाडण्याबद्दल केलेली व परमेश्वर निर्मिति असलेली मूलभूत कल्पना " हा नवीन अर्थ, व्युत्पत्तिशास्त्राप्रमाणे बरोबर असून तो आपल्या हिंदुधर्मशास्त्राच्या परंपरागत कल्पनेला धरून आहे. त्याप्रमाणे व्यवस्था जगातील सर्व समाजात प्रत्यक्षात आढळून येते. वेद, धर्मशास्त्र व अवेस्ता या सर्वात हीच कल्पना आहे व तिला शास्त्रीय सिद्धान्ताची बैठक आहे. ही वर्ण या शब्दाची व्याख्या मीमांसाशास्त्रालाही धरून आहे. तसेच ही व्याख्या गृहीत धरल्यास हिंदुधर्मशास्त्रापासून योग्य असे निष्कर्ष निघतात. किंबहुना ही व्याख्या गृहीत धरल्यास मनुस्मृतीतील " मनुप्रणीत समाजरचना " हीच आदर्श लोक-



अनुक्रमणिका






शाही आहे हे सहज सिद्ध करता येते. या सर्वा-वरून ही "वर्ण" या शब्दाची नवीन दृष्टिकोणातून केलेली व्याख्या सर्वस्वी बरोबर आहे असा ठाम निष्कर्ष काढण्यास काहीही हरकत नाही. तसेच पाश्चि-मात्यानी वर्ण ह्या शब्दाचा केलेला अर्थ हा खोट्या अनुमानावर अवलंबून असून अशास्त्रीय ठरलेला आहे. व तोच बरोबर असे गृहीत धरून आपण जर हिंदुधर्मशास्त्राचा अभ्यास तसाच चालू ठेवला तर जगाच्या अंतापर्यंतसुद्धा हिंदुधर्मशास्त्राचे यक्षप्रश्न आपणास कदापीही सोडविता येणार नाहीत. कारण आजपर्यंतच्या जगाच्या इतिहासात 'आर्य' या नावाचा वंश कोणासही उपलब्ध झालेला नाही. आर्यवंश ही संपूर्णपणे बनावट गप्प गोष्ट आहे; कारण तिचे अस्तित्व अद्याप कोणासही सिद्ध करता आलेले नाही. या कल्पनेचा त्याग करून आपले धर्मशास्त्र समजण्यास नवीन वर्णाच्या व्याख्येचा अंगीकार तात्बडतोब करणे अत्यंत जरूर आहे.

---

## मराठीतील 'फागु' गीते*

मराठीत मासांच्या महिम्याची गीते परंपरेने लिहि-ण्याची रीत रूढ नाही. वासंतिक-शारदीय सृष्टिवर्ण-नाची फुटकळ गीते आढळतात. पण जुन्या राज-स्थानी-गुजरातीत अशी गीते आढळतात. गुजरातीत 'बारमासी' आणि 'फागु' काव्ये बरीच उपलब्ध आहेत. बडोद्याच्या प्राच्यविद्या मंदिराने डॉ. सांडेसरा-संपादित "प्राचीन फागु-संग्रह" प्रसिद्ध केला आहे.

रत्नागिरी-कुलाब्याच्या कोंकण भागात शिमग्यातील अश्लील-बीभत्स रचनांना 'फाक' म्हणतात. 'फाक' व 'फाग' यांतील संबंध उघड आहे. पण ललित काव्यांच्या स्वरूपातील फाल्गुनविषयक रचना नाहीत. गुजराती-राजस्थानी 'फागु' रचना अशी फाल्गुन (फागण) विषयक ललित काव्ये आहेत.

पुढे उल्लेखिलेल्या दोन 'फागु' रचना संमिश्र मराठीत आहेत. त्यांतील एका रचनेचा — 'चैतन्य फाग' गीताचा-उल्लेख श्री. अेस्. जे. किल्लेदार यांनी "मराठी जैन साहित्य" नावाच्या आपल्या लेखात ("आचार्य, भिक्षु-स्मृति ग्रंथ" पाहा) केला आहे. श्री. अगरचंद नाहटा यांनी "आमेर शास्त्र भंडार" मधील "सूची" वरून (त्यातील 'गुटका नं. ५०' मधून) ही काव्ये नकलून मागविली व संपूर्ण प्रसिद्ध केली आहेत.

या गीतांचा लेखक कामराजु. तो मेघराजाचा गुरुबंधु. मेघराजाचा काळ इ. स. चे १७ वे शतक. त्यावरून कामराजाचा काळही तोच हे सिद्ध होते. या कामराजुने "सुदर्शन पुराण" लिहिले आहे. या सर्व रचना जैन धर्मीय आहेत.

येथे फक्त नमुन्यासाठी या दोन्ही गीतातील दोन-दोन कडवी दिलेली आहेत. त्यातील पहिल्यात मात्रिकछांदस 'पतितपावन'. 'चंद्रकांत' रचना भासते. दुसऱ्यात पोवाड्याची ढब आहे.

### (१) चैतन्य फाग

त्रिलोकी भवनि राघो होई उदासु ।
लक्ष उचरासी झाडे करिता रहिवासु ॥
करम पारधि तुझा मांडिला पासु ।
क्रोध मांजरा तुझा करैल नासु ॥ १ ॥ ध्रु० ॥
आतमा चैतन्य राघो गाथला परि ।
अनंत गुणे राघो तुझी तु सरी ॥
जानता नेनता राघो कवीला परि
'कामराजु' म्हणे राखो, वेगे ऊधारी ॥ १४ ॥

### (२) धर्म फाग

पहिलें नमन देवा जिनेश्वरा,
नमन सार जे गणधरा । गाजी०
नमन करिन जि निग्रंथ गुरा,
कवित प्रसन होइ जो दातारा ॥ गाजी० ॥ ध्रु ॥
जीवदया धरमु पाळती,
हिंसा-पाप हालती । गाजी०
'कामराजु' म्हणे धरमु करीती,
तो जीव पावे मुगती । गाजी० ॥ १३ ॥

— ना. ग. जोशी

* श्री. अगरचंद नाहटा यांच्या गुजराती "स्वाध्याय" त्रैमासिकाच्या जन्माष्टमी अंकांतील, (ऑगस्ट १९६५) 'कामराजु-रचित मराठी फागु काव्य' या लेखावरून ही माहिती येथे दिली आहे. गुजरातचे वैष्णव कवि दयाराम याच्या मराठी गीतांची माहिती वाचकांना असेलच. —लेखक



अनुक्रमणिका






श्री. शं. बा. जोशी

# अदिति आणि अंभृणी देवी

## अंभृणी देवीचे आत्मकथन
### ( ऋचा १ ते ५ पूर्ण )

**प्रस्ताव**

अदिति व अंभृणी या देवींच्या आविष्कारात फारच फरक असल्यासारखे वर वर दिसते. पण अभिव्यक्तींत फरक वाटला तरी मूळ आशय ( देवतातत्त्व ) समान असल्याचे, सूक्ष्म अवलोकनानंतर लक्षात येते. अदिति देवीची घडण बरीच सुटसुटीत आहे; पर अंभृणीची प्रतिमा नाना संकीर्ण संकेतानी युक्त आहे. म्हणून अंभृणी देवीचे सम्यक् आकलन होण्याच्या दृष्टीने, या देवीचे आत्मकथनपर सूक्त संपूर्ण, मुळातूनच जाणणे अवश्य आहे. या सूक्ताच्या अर्थाकरता, पुण्यश्लोक सायणांना वाट पुसत पुढे पाऊल ठेवावे लागते. सायणभाष्यात उणीवा आहेत, हे मान्य करूनही, पाश्चात्यांना सुद्धा, या महाभागांचे ऋण मान्य करावे लागत आहे. सायणभाष्य नसते तर वेदार्थाच्या निबिड अरण्यात प्रवेश मिळणे दुष्कर झाले असते. सायणभाष्य व आधुनिक संशोधन तंत्र वापरूनही वेदातील ऋचांच्या अर्थाचा प्रयत्न हे एक मोठे धाडसच होय ! हे धाडस, शहाणपणाचे किंवा मूर्खपणाचे याचा निर्णय थोड्या कालावधीनेच ठरावयाचे आहे– अशा निरनिराळ्या प्रयत्नांच्या एकूण समालोचनातून अंभृणीदेवीचे आत्मकथनपर एकच सूक्त असल्याने, त्याचा सखोल अभ्यास होणे शक्य आहे. हे सूक्त अनेक दृष्टीने अनन्य साधारण आहे. आवेशयुक्त भाषेतील अशा प्रकारचे आत्मकथनपर सूक्त, वेदात हेच एक ! आत्मनिवेदनातील या प्रकारात विशिष्ट पंथीय अभिनिवेश ठिचून भरला आहे, या सबंध सूक्तात, – अथ पासून इति पर्यंत ! पण हा आवेश, हा अभिमान यज्ञसंप्रदायविरोधी आहे, हे चट्दिशी लक्षात न येईल अशी दक्षता बाळगलेली आहे. या सूक्ताचे आत्मनिवेदनपर हे तंत्र, या कवीने मोठ्या कौशल्याने वापरल्याचा प्रत्यय येतो. यातील पदप्रयोग मार्मिक अर्थयुक्त आहेत; पण ते, सहज स्फूर्तीतले नसून विचारपूर्वक उपयोजिलेले असल्याच्या संशयाला जागा आहे. * ऋग्वेतील पूर्वीच्या विचारांना कलाटणी मिळून, नवीन वैचारिक भूमिका प्रभावशाली होऊ लागल्याचे प्रत्यंतर या सूक्तात मिळते. म्हणून भारतीय सांस्कृतिक इतिहासाच्या दृष्टीने हे सूक्त फार मौलिक ठरणार आहे.

---

* मान्यवर डॉ. रा. ना. दांडेकर यानी ऋग्वेदातील 'हृद्' व 'मनस्' या पदयोजनेतील औचित्यचर्चा मानसशास्त्रीय दृष्टीने फार सुंदर रीतीने केली आहे ( सिद्धभारती, पृ. १३७–१४२ ). दिक कवीत 'सुवृक्तिभिः' 'तक्षा'प्रमाणे नक्षीदार कारागिरीने रचलेली कवने आहेत; आणि 'हृदा मतिं ज्योतिरनु प्रजानन्' अशा प्रकारची उत्स्फूर्त अंतःकरणाने रचली गेलेली कवने आहेत ( पा. १३९ ); स्वाध्यायनिरत वंद्य प्रा. वेलणकर यानी, 'ऋग्वेदातील भक्तिमार्ग' या प्रबंधात वैदिक कवींना आपल्या कृतीविषयी कशी जाणीव असे याचे थोडक्यात सोदाहरण विवरण केले आहे : 'इदं वचः स्वादोः स्वादीयः' असे हे सूक्त आहे; 'घृतात् स्वादीयो मधुनः च वोचत' : ताज्या तुपापेक्षा गोड व मधापेक्षा स्वादिष्ट असे हे स्तोत्र आहे; असे म्हणण्यात कवीने ही कवने काही विचारपूर्वकही रचली असल्याचे उघडकीस येते. वसिष्ठाच्या या उक्तीत तर हे स्पष्ट जाणवत आहे : 'थोटका नसलेला, सुटसुटीत व बांधेसूद व सुंदर अलंकारानी युक्त असा मंत्र यज्ञार्ह देवाना ' अर्पण करा ' ( मंत्रं अखर्वं सुधितं सुपेशसं दधात यज्ञियेष्वा ) ( 'ऋग्वेदातील भक्तिमार्ग, पा. ३८–३९ )



अनुक्रमणिका






हे सूक्त, प्रथम पूर्णपणे पुनः पुनः वाचून मनन करीत, मगच याच्या अर्थविवरणाकडे वळावे हे उत्तम. अर्थविवरणाच्या अनुकूलतेसाठी, याचे पाच स्थूल विभाग कल्पिले आहेत. मननासाठी त्या विभागांप्रमाणेच संपूर्ण सूक्तच दिलेले आहे. ( सर्व विभागांचे अर्थ व विवरण एकाच अंकात प्रकाशित होणे शक्य नाही; म्हणून त्या त्या विभागांवरोबर योग्य तेवढाच अर्थ व विवरण क्रमाने येईल. )

## अंभृणी देवीचे संपूर्ण सूक्त

### I देवांमध्ये सर्वश्रेष्ठ मी

i अहं रुद्रेभिः वसुभिः चरामि,
अहं आदित्यैः उत विश्वदेवैः ।
ii अहं मित्रावरुणोभा बिभर्मि;
अहं इंद्राग्नी अहं अश्विनोभा ॥१॥
अहं सोमं आहनसं बिभर्मि;
त्वष्टारं उत पूषणं भगम् ।

### II विश्वधात्री-अन्नदात्री मी

अहं दधामि द्रविणं हविष्मते सुप्राव्ये
यजमानाय सुन्वते ॥२॥
अहं राष्ट्री संगमनी वसूनां;
चिकितुषी प्रथमा यज्ञियानाम् ।
तां मा देवाः व्युदधुः पुरुत्रा भूरिस्थात्रां,
भूरि आवेशयंतीम् ॥३॥
मया सो अन्नं अत्ति; यो विपश्यति, यः प्राणिति,
यः ईम् शृणोत्युक्तम् ।

### III मी कोण आहे जाण; मला उपेक्षिल्यास सर्वनाश ओढवेल ! सावध रहा !

अमंतवो मां ते उपक्षियंति; श्रुधि श्रुत,
श्रद्धिवं ते वदामि ॥ ४ ॥
अहमेव स्वयं इदं वदामि; जुष्टं देवेभिः
उत मानुषेभिः ।
यं कामये तं तमुग्रं कृणोमि; तं ब्रह्माणं
तं ऋषिं तं सुमेधाम् ॥ ५ ॥

### VI सर्वाधिकारी मी !

अहं रुद्राय धनुः आतनोमि; ब्रह्मद्विषे
शरवे हंतवा उत ।
अहं जनाय समदं कृणोमि; अहं द्यावापृथिवी
आ विवेश ॥ ६ ॥

### V विश्वाची आदिकर्ती मी आहे

अहं सुवे पितरं; अस्य मूर्धन् मम योनिः
अप्सु अंतः समुद्रे
ततो वितिष्ठे भुवनानु विश्वा, उत अमूम्
द्यां वर्ष्मणोपस्पृशामि ॥ ७ ॥
अहं एव वात इव प्रवामि;
आरभमणा भुवनानि विश्वा ।
परो दिवा पर एना पृथिव्या एतावती
महिना संबभूव ॥ ८ ॥

## या सूक्ताचा विभागशः अर्थ आणि विवरण

### I देवात सर्व श्रेष्ठ मी !

**ऋचाः-** ( १ ) अहं रुद्रेभिः वसुभिः चरामि;
अहं आदित्यैः उत विश्वदेवैः ।

**अर्थः-** रुद्रिय व वसू, हे माझे सांगाती आहेत. याचप्रमाणे, आदित्य व विश्वदेव हे माझे सोबती आहेत.

**विवरणः-** पहिल्या ऋचेतील पहिल्या चरणात, आपल्या आत्मचरित्रातील एक महत्वाचा अंश अंभृणि सर्वांसमोर उघड करते. कोणत्या देवता-समूहाबरोबर आपला निकट संबंध आहे, याचे विवरण करते. या देवगणात एक भेद कल्पिण्यात आला असून, हे तारतम्य या देवीच्या वक्तव्यातून स्पष्ट होते. पहिल्या ऋचेतील पहिल्या पंक्तीत सांगण्यात आलेल्या देवगणाशी या देवीचा संबंध एक प्रकारचा दिसतो. तर पहिल्या ऋचेच्या दुसऱ्या चरणात, तसेच दुसऱ्या ऋचेच्या पहिल्या चरणात उल्लेखिलेल्या देवता-गटाशी असलेला संबंध अगदी वेगळा! या दोन्ही संबंधातील स्वरूप निराळे कसे, याचा उलगडा, या विभागाच्या पूर्ण परिशीलनानंतर होणार आहे.

**ऋचाः-** १ ) अहं मित्रावरुणोभा बिभर्मि;
अहं इंद्राग्नी अहं अश्विनोभा ॥
**ऋचाः-** ( २ ) अहं सोमं आहनसं बिभर्मि,
त्वष्टारं उत पूषणं भगम् ॥

**अर्थः-** ( १ ) मित्रावरुण या दोघांची भर्त्री ( पोसणारी ) मी आहे. इंद्राग्नी वगैरेंना प्रेरणा देणारीही मीच ! ( २ ) शत्रुविनाशक (शक्तिशाली) सोमदेवाला सौमत्व देणारी, व त्वष्टापूषण, आणि भग

या दैवतांच्या अस्तित्वाला कारण अशी मीच होय !

**विवरणः**– सर्व पुरुषदैवताहून आपण श्रेष्ठ आणि सर्वोत्तम आहोत असे, या भगवतीला सिद्ध करावयाचे आहे. या विभागातील शेवटच्या तीन पंक्तीत सर्वोत्तमत्वाचा हा ध्वनी स्पष्ट कानी येतो ही देवी, आपण काहींच्या सह, "चरामि" असे सांगते; आणखी काहीना "अहं बिभर्मि" असे म्हणते. "**चरामि**" या पदयोजनेत या देवीचा या गटाशी असलेला सहचरभाव व्यक्त होत आहे; या सहचर भावात समान शीलता व्यक्त होते सांगातीशी मिळून–मिसळून संचरण्यात स्नेह आहे, प्रेम आहे. आणि "**बिभर्मि**" या शब्दात पोष्य–पोषित हा भाव समाविष्ट आहे. यामुळे येथे यजमान व सेवक हा संबंध सूचित होतो. "बिभर्मि" क्रियापदाचे मूळ भृ-भर्; या आख्याताला बरेच छायार्थ आहेत : संरक्षण करणे, पोसणे, धारण करणे, वहाणे, प्रेरणा देणे, आधार देणे, राज्य करणे, अधिकार चालविणे, अनुभवणे इत्यादि.

म्हणून, अंभृणि ज्यांच्यासह "चरामि" म्हणते, ते रुद्रिय, वसु, आदित्य आणि विश्वदेव हे या देवीचे विशेष आवडते देव होत; हे देव तिला जास्त जवळचे वाटत हे स्पष्ट आहे. आणि अंभृणि ज्यांची 'भर्त्री' आहे, ते मित्रा-वरुण, इंद्राग्नी, अश्विनीकुमार, सोम, त्वष्टा, भग या गटातील देव हे या देवीचे 'भृत्य' होतात. म्हणून यांच्यापेक्षा या देवीचे रुद्रादि सह-चर देव, हे योग्यतेत श्रेष्ठ आहेत, असे या ऋचेतून ध्वनित होते.

देवांच्या या दोन्ही गटांपैकी दुसऱ्या गटाचे मित्रा-वरुण, इंद्राग्नी, अश्विनी ( मुख्यतः नासत्य ) सोम, त्वष्टा, पूषन व भग हे देव ( विवस्वान् ) सूर्याशी संबंधित आहेत. ही सौरतत्वाधिष्ठित दैवते असल्याचे सर्वमान्य आहे. परंतु या सौरदैवतांची मूलाधारशक्तिही आपण असल्याचे ही देवी या सूक्तात सांगत आहे. अंभृणीच्या या आत्मनिवेदनातील मुख्य रोख काय ? तर हा देवी ( शक्ति ) संप्रदायच सर्व श्रेष्ठ व इंद्राग्नी वगैरे देवांच्या आराधकांचा संप्रदाय कनिष्ठ असे हे सूक्त ध्वनित करते ! या सूक्त रचनाकाळाच्या सुमारास याजक सौरसंप्रदाय संपूर्णतया हतप्रभ होत चालला होता असे यावरून उघड होते.

## II विश्वधात्री, अन्नदात्री अशी मी

**ऋचाः**– २) अहं दधामि द्रविणं हविष्मते सुप्राव्ये<br>यजमानाय सुन्वते ॥<br>३) अहं राष्ट्री; संगमनी वसूनां;<br>चिकितुषी; प्रथमा यज्ञियानाम्।<br>तां मां देवा व्यदधुः पुरुत्रा<br>भूरिस्थात्रां भूरि आवेशयंतीम् ॥<br>४) मया सो अन्नं अत्ति यो विपश्यति<br>यः प्राणिति यः ईम् शृणोत्युक्तम्।

**अर्थः**– २) हविर्युक्त सोम पिळणाऱ्या व ते देवाला अर्पण करून तृप्त करणाऱ्या यजमानाला द्रव्य देणारी मीच होय.

३) विश्वावर राज्य करणारी अधिकारी ( राष्ट्री ) मी आहे; धन देणारी मी; ज्ञानीही मी; यज्ञीय दैवतात अग्रगण्य मी आहे. विश्वात नाना रूपाने सर्वत्र असणाऱ्या दैवतांना आवेशशक्ती मजकडून मिळते. त्यांना शक्तिदात्री मी.

४) सारे प्राणिमात्र जेवतात-खातात माझ्यामुळे! पहातात, विचार करतात, ते माझ्या प्रेरणेमुळे; श्वासोच्छ्वास करीत जगतात ते माझ्या कृपेमुळे. भाषण कानानी ऐकतात ते माझ्यामुळे; माझ्या संमतीनेच !

**विवरणः**– ही भगवती म्हणजेच विश्वात्मशक्ती! या देवीच्या इच्छेविरुद्ध गवताची एक काडीसुद्धा हालू शकत नाही; असे जनमनावर बिंबविण्याचा उद्देश असल्याचे या भागावरून स्पष्ट होते. ही आदिशक्ती विश्वाच्या अंतर्बाह्य क्रियाशक्तीचे केंद्रस्थानच असल्याचे येथे विवरण करून सांगितले आहे.

"अहं ददामि द्रविणम्," "संगमनी वसूनाम्..." या प्रकारच्या बाह्य लौकिक क्रिया होत. ही देवी स्वतःच "राष्ट्री" असल्यामुळे, लोकांना धन-कनकादि संपत्ति देणारी आपण स्वतःच, आपल्याशिवाय दुसरे कुणी नाही, असे सांगण्याच्या या







झोकात, ही देवी आणखी कुणा देवांबरोबर स्पर्धा तर करीत नाही ना ? अशी शंका चाटून जाते.

सारे प्राणिमात्र जगतात ते केवळ आपल्या इच्छेमुळे ! सर्वांची प्रेरक-तारक आपणच; हे बोल, विश्वाच्या आंतरिक संचालक-सामर्थ्याचे सूचक आहेत. या विषयातही देवीचे हे बोल, दुसऱ्यांना मागे सारणारा आवेश प्रदर्शित करतात. तर मग ही स्पर्धा, ही ईर्षा कुणाबरोबर ? हे समजणे शक्य आहे का ?

हे दोन प्रकारे समजून येणे शक्य आहे... (१) ऋग्वेदात सगळीकडे "द्रविणोदा" असे वर्णिलेला देव तो, अग्नीच होय. या वेदाचा प्रारंभ मुळी "रत्नधातमम्" अग्निदेवाच्या स्तोत्रापासून होतो. "अग्निमीळे.... रत्नधातमम्" ! त्वम् अग्ने द्रविणोदा अरंकृते त्वम् देवः, सविता, रत्नधा असि ! ( II. १. ७. ) 'द्रविणोदा अग्निः दधात् वसूनि ( I. १५. ७. ८ ) "वीरवत्तमम् यशसम्" देणारा देव अग्नि हाच होय. असे वर्णिलेले आहे.

अग्नीप्रमाणेच इंद्रादिदैवतातही हे सामर्थ्य होते "इंद्रः धनानां इरजति" ( I. ७. ९ ); "गोभिः अश्वैः शतक्रतो पृणः" "द्रविणोदा दीर्घमायुः रासते;" "द्रविणोदा सोमः मयस्करत्" ( V. ४६. ४ )

सूर्य- अग्नीमध्ये समाविष्ट होणाऱ्या इंद्र-सोमादि सर्वामध्ये 'द्रविणोदा", "वसुदा", "गोदा", "आयुर्दा", अशी शक्ति होती. विशेषतः अग्नीला "द्रविणोदा" असे वेदात पर्यायनामच असल्याचे समजते. वैश्वानर अग्नीची थोरवी गाण्यात ऋषींमध्ये एके काळी अहमहमिका लागत असे ! तो अग्नी, आपला 'मृत्य' म्हणते ही भगवती!

"सूर्य आत्मा जगतः तस्थुषः च" चराचर विश्वाचे **आत्मस्वरूप** (नियंता) म्हणजे सूर्य, अशी ऋग्वेदातील कवींची एकेकाळी श्रद्धा होती.

ऋग्वेदाचे मुख्य दैवत म्हणजे इंद्र, असे मानले जाते. "राजा" "सम्राट" असे वर्णिला जाणारा वरुण हा एकटाच आहे. एके काळी इंद्रा-पेक्षा वरुणालाच अग्रस्थान होते, असे संशोधकांचे मत आहे. पण प्रस्तुत, एक स्त्री देवी, या सर्व एकाहून एक श्रेष्ठ अशा पुरुषदैवतांशी स्पर्धा करीत असल्याचे दृश्य या सूक्तात उघडकीस येत आहे.

२) भगवती अंभृणी या साऱ्या सौरदेवताना स्थानभ्रष्ट करून आपण स्वतःच त्या जागी विश्वात्मशक्ति होऊन उभी ठाकल्याचे दृश्य या देवी-सूक्तात दृष्टीसमोर उभे रहाते. त्या सर्व सौर देवांना "अहं बिभर्मि" असे ही देवी स्वतःच सांगते यामुळे देवीच्या या बोलण्यात व्यक्त होणारा स्पर्धेचा भाव कुणाला उद्देशून आहे ? वा ही देवी कुणाशी स्पर्धा करीत आहे? हे उघडच आहे. हे ठरविण्यास आणखी दुसऱ्या बाह्य प्रमाणांची आवश्यकता ती काय?

परंतु एक अडचण अशी की, "चरामि" व "बिभर्मि" याप्रमाणे विभागलेल्या दैवतांमध्ये पहिल्या गटातील देवांच्या नावामध्ये उल्लेखित वसू, आदित्य व विश्वदेव हे संकेत रुद्रियांच्या नावासारखी निःसंदिग्ध नाहीत. वसूंमध्ये कुणाकुणाचा समावेश होतो? आदित्य, मरुत, अश्विनी, इन्द्र, उषा, रुद्र, वायु, विष्णु, शिव, कुबेर अशी एक मोठी यादी मो. विल्यम्स् हे सांगतात. पण वसू हे आठ आहेत. वसूंमध्ये इंद्राला अग्रगण्य मानण्याचा एक काळ होता. वृत्रघ्न इंद्राला "**वासव**" असे म्हटलेले आहे. "वस्" आख्यातातला चकाकणे, प्रकाशणे असा अर्थ आहे. चकाकणे, प्रकाशणे या अर्थाच्या दिव्‌पासून "देव" हा शब्द रूढ झाला-आहे म्हणून "दिव्" "देव" याला जो अर्थ आहे, तोच अर्थ, "वस्" "वसू"ला आहे. खरोखर मूळार्थाच्या दृष्टीने 'वसू' व 'देव' यात फरक नाही. इंद्राप्रमाणेच अग्नीही एकेकाळी वसूंचा अध्वर्यु गणला जात होता. इंद्र व अग्नि यांच्यानंतर हे स्थान विष्णूला प्राप्त झाल्याचे दिसून येते !

विष्णुपुराणात "आप" हे दैवत वसूंमध्ये गणले गेले आहे ! आणखी एक विशेष म्हणजे या पुराणात वसूंच्या यादीत, "आप"ला सर्व प्रथम स्थान आहे ! "विष्णु" ( पुराण ) आपसंप्रदाय पक्षपाती असल्याचे येथे दृष्टोपत्तीस येते. "मम योनिः

अप्सु अंतः समुद्रे" असे सांगणारी अंभृणि देवी ही, (पुरुषरूपी) आपदेवाची किंवा 'रसोऽहं अप्सु' असे म्हणणाऱ्या (जलशायी) विष्णु नारायणाची सहचरी असावी; व 'मी वसूंसह 'चरामि' असे म्हणण्यात 'वसु' नावाने अभिप्रेत असलेला देव हाच असावा असे वाटते.

परंतु प्रस्तुत लक्ष वेधून घेणारी गोष्ट वेगळीच आहे : वसू व आदित्य म्हणजे निश्चित कोणती दैवते असावीत ? ही देवी वसूंना आपले आत्मीय म्हणते. परंतु वसू दोन प्रकारचे आहेत. त्यातले, या देवीला जवळचे कोण ? वरील वसूंची यादी पाहता त्यात दोन गट दिसतात : (१) अग्नि-सूर्याला जवळचे; व (२) आपःरसाला जवळचे. या दोन प्रकारच्या वसूंपैकी या भगवतीला जवळचे वसू कोण ? हे सांगण्याची जरूरी नाही. कारण हे उघड आहे: ती स्वतः आपस्वरूपी आहे, आणि इंद्र वगैरे आपले आत्मीय नव्हेत असे ही देवी स्वतःच सुचवते! अंभृणीच्या आत्मीयांच्या यादीत रुद्रांचे नांव स्पष्टच आहे. व रुद्र आणि रुद्रिय आपः रस स्वरूपी असल्याचे यापूर्वीच (सप्टेंबर अंकात) विवेचन आले आहे. या संदर्भातील वसूंच्या उल्लेखामुळे, आपःरस संप्रदायाच्या वसूंचे अस्तित्व वेदकाळापासूनच असल्याचे येथे उघडकीस येते ! सौर दैवतांचा प्रभाव जसजसा कमी होतो तसतसे वेदकाळातच या आपोवसूंचा प्रभाव वाढतो ! शेवटी "वासुदेव" संप्रदायाच्या नावाने हा आपोवसु पंथ ऊर्जितावस्थेस येतो व याजक-पंथीय वासव (इंद्र) संप्रदाय पूर्णपणे नामशेष होतो ! ही घटना आज उघड दिसत आहे ! "वासुदेवः तोयात्मा" ह्या प्राचीन उक्तीने आपो वसु संप्रदायाचे रहस्य उघड केले आहे! "नार्-मर" नामक एका इंद्रवैऱ्याबरोबर येणारे, ऋग्वेदातील एका "सह-वसू"चे नाव या संदर्भात अभ्यसनीय आहे. येथे "नार् (मर)" व "वसू" ह्या संकेतांना, या पार्श्वभूमीवर विशेष अर्थ प्राप्त होतो. "आपो नाराः" महाभारतातील या उल्लेखाप्रमाणे, नार-नार् हे "आप" वाचक अर्थ असणारे संकेत होत. महाभारततही एक "उप-चरी वसू" आहे, नारायणाख्यानात ! ऋग्वेदांतील नार्मरा समवेत असणारा "सह" वसु, तसेच महाभारतातील नारायण-भक्त "उपचरी" वसु या दोघा वसूंच्या नावामधील शीलस्वभावसूचक पदातील साम्य अर्थविहीन म्हणता येणार नाही; या वसु नामांत काहीतरी आंतरिक सांकेतिक, सूत्र असणे शक्य आहे.

इंद्र हा आपोरूपी वृत्रादिकांचा वैरी हे सुप्रसिद्ध आहे. 'नार्'-मर, व सह-वसू हे इंद्र विरोधी होते हे ऋग्वेदातील उल्लेखावरून स्पष्ट आहे (II·१३·८) इंद्राने, नारायणाचा तपोभंग करण्याचा प्रयत्न केला ही कथा पुराणात प्रसिद्ध आहे. वासुदेव-कृष्ण व इंद्र यांचा बेबनावही सर्वश्रुत आहे. एका वसु-शाखेच्या इंद्रविरोधाच्या या पार्श्वभूमीवर, अंभृणीचे, "इंद्राग्नी अहं बिभर्मि" हे आवेशयुक्त बोल उद्देशपूर्वक असल्याचे निश्चित होते. इंद्रानुज-उपेंद्र म्हणविलेला विष्णु, इंद्राला मागे सारून आपणच देवोत्तम म्हणवून घेतो. विष्णूचा अवतार म्हणविणाऱ्या वासुदेव-कृष्णाच्या चरित्रातील इंद्राशी सामना दिल्याची, गोवर्धन पर्वताची कथा विचारार्ह आहे, या साऱ्या गोष्टीत वसु संप्रदायाची परंपराच सामावलेली दिसते. यामुळे अंभृणी देवी आपण ज्यांच्यासह "चरामी" म्हणते, त्या "वसू"मध्ये "विष्णु" संप्रदायाची दैवतेच अभिप्रेत आहेत, असे म्हणावे लागते. 'इंद्राग्नी बिभर्मि' म्हणणारी देवी, वासव इंद्राला जवळ करील असे म्हणता येत नाही. हा 'वासव' विष्णु (:आप) असणेच जास्त संभाव्य आहे.

### आता आदित्यांचा विचार

ऋग्वेदात एके ठिकाणी आदित्यांची सहा नावे स्पष्ट येतात. (II. २७) मित्र, अर्यमा, भग, वरुण, दक्ष आणि अंश. म्हणून, आदित्य हे सहा आहेत असे वाटते; परंतु याच सूक्ताच्या चौदाव्या ऋचेत इंद्राचाही 'आदित्य' म्हणून उल्लेख येतो; म्हणून ते सात होतात. आणि नवव्या मंडलाच्या एकशे चौदाव्या ऋचेत, स्पष्टपणे सातांचा उल्लेख येतो. पण ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलात बाहत्तराव्या सूक्तात हे आठ झाले आहेत (मार्तांडासह) ! शतपथ ब्राह्मणाच्या सुमारास हे आदित्य








बारा झाले ! पण हे कोण, हे जरी निश्चित नसले तरी मित्र, वरुण, अर्यमा, भग, दक्ष, अंश व मार्तांड ही सात नावे कानी येतात. विष्णूला वेदांत 'आदित्य' म्हटले असले तरी, सांप्रदायिक यादीत त्याचा स्पष्ट उल्लेख कोठे नाही ! वरील सात नावात " दक्ष " वगळल्यास बाकीची सारी, सौर-तत्त्वाधिष्ठित दैवतेच आहेत ! "दक्ष" हे नाव देव-जनन सूक्तात अदितीबरोबर आले आहे. (X.७२) अदितीच्या "मधुमत्पयो"-रूपाबद्दल पुरेसे विवरण पहिल्या तीन लेखात आले आहे. अदिति-दक्ष संबंधाबद्दल बोलताना "अदितेः दक्षः अजायत " असे सांगून लगेच "दक्षात् अदितिः " झाली असे स्पष्ट केलेले आहे ! अदिति-दक्षांच्या या संबंधा-मुळे अदितीप्रमाणेच दक्षही मधुमत्पयोरूपीच होतो. " अदितीपासून झालेले ते आदित्य " हे सामान्य सूत्र आहे. तरीही, दक्षाप्रमाणे आदितीच्या जन्मास कारण झालेला कोणताही दुसरा आदित्य आढळत नाही. म्हणून अदितीप्रमाणेच अंभृणीही, मी ज्यांच्या सह " चरामी " म्हणते, असा हा या आदित्यामध्ये 'दक्ष' हाच असावा, असे अनुमान अनिवार्य ठरते.

आणखी एक गोष्ट : आदित्य हे, आपले आत्मीय सह-चर असे अंभृणीने सांगितले असले तरी, आदित्यामध्ये श्रेष्ठ गणलेल्या सम्राट् वरुणाला-सुद्धा ह्या देवीने, आपला समान सांगाती म्हणून गणले नाही ! आदित्य व वसूंमध्ये अंतर्भूत अस-णारे वरुण, मित्र, इंद्र, अग्नि, अश्विनी, सोम, भग या सर्वांना, ह्या देवीने आपल्या कृपापोषित छायानुवर्ती भृत्य-मालिकेत गुंफले आहे! या कारणामुळेही "आदित्यां" मध्येही सहचरत्वाचे भाग्य फक्त "दक्षा"च्याच वाट्याला आलेले दिसते.

अंभृणी देवीच्या आत्मकथनाच्या पुढील विभा-गात, यापेक्षा कुतूहलजनक व उद्बोधक गोष्टी उघडकीस येत आहेत. प्रस्तुत विभागात सूचित होणारी गोष्ट ही.

- सर्व देवतांमध्ये श्रेष्ठ अशी आपणच; विश्वा-धारशक्ती आपण; आपल्यामुळेच सारे प्राणिमात्र श्वासोच्छ्वास करतात; अशा प्रकारे या भगव-तीच्या या निवेदन पद्धतीत, स्पष्टास्पष्टपणे, आणखी काही सांस्कृतिक महत्त्वाच्या गोष्टी ध्वनित होत आहेत. अग्नि संप्रदायाच्या इंद्रवरुणादी सौर-देवतां-पेक्षा आपःरस तत्त्वाचे रुद्र, वसु, आदित्य हे देव, या देवींला जास्त जवळचे वाटत असल्याचे उघडकीस येते; व पर्यायाने याजक संप्रदायाची प्रतिष्ठा लुप्त झाल्याचे आणि आपःरस संप्रदाय वरचढ होत अस-ल्याचे या सूक्तातून ध्वनित होते.

**III मी कोण, हे जाण ! मला**
**उपेक्षिल्यास सर्वनाश ! सावध रहा !**

**४ ) अमंतवो मां उपक्षियंति श्रुधि श्रुत,**
**श्रद्धिवंते वदामि ।**
**५ ) अहमेव स्वयम् वदामि, जुष्टम् देवेभिः**
**उत मानुषेभिः ।**
**यं कामये तं तमुग्रं कृणोमि; तं ब्रह्माणं;**
**तं ऋषीम् तं सुमेधाम् ॥**

**अर्थः**— (४) ( आतापर्यंत सांगितलेली माझी थोरवी व माहात्म्य लक्षात न घेता) जे माझी उपेक्षा करतील ते ( दिवसेदिवस ) क्षीण होतील. हे सारे ऐकून, जाणून घेणाऱ्या विवेकी ( श्रुत ) भक्ता, ( माझे बोल ) ऐक. माझ्या सांगण्यावर श्रद्धा ठेव. मी सत्य सांगते.

( ५ ) कोणत्याही देवांना व मानवांना अपेक्षित ( प्रिय ) असे ते ( गुह्य ज्ञान ) मी स्वतः सांगते. मी ज्याना-ज्याना चहाते ( कामये ), त्याना ओजस्वी करते, त्याना ब्रह्मसिद्धी देते; कवी (ऋषी) बनवते; धैर्यशील ( वीर ) किंवा मेधावी ( बुद्धि-मान् ) करते.

**विवरणः**— लोकविनाशशक्ती आणि लोकानु-ग्रह-शक्ती या दोन्ही शक्ती आपणात सामावल्या आहेत, असे ही देवी या वाक्यात स्पष्ट करते. मी ज्यांच्यावर प्रसन्न होते, त्याना सर्वसमर्थ करते. म्हणून हे जाणून आपणावर अविचलित श्रद्धा ठेवून स्वतःचा उद्धार करून घेण्यास, जनाना ही देवी आव्हान करीत असल्याचे येथे दिसते. संरक्षक आणि संहारक शक्ती असणाऱ्या आपणास उपेक्षिणारे दिवसेदिवस क्षीण होत नाश पावतील, असे ही देवी

जगाला बजावीत आहे ! भाषणाचा परिणाम वाढवण्यास व सांप्रदायिक श्रद्धा दृढ करण्यास हे बोल आवश्यकच ठरतात.

" देव व मानव जे अपेक्षितात ते वरदान देण्याची शक्ती आपल्यात आहे " या अशा बोलण्यात स्पर्धेचा सूर असल्याचे ऋग्वेदातील अग्नि, सूर्याच्या संबंधात आढळून येते. " हविष्मते द्रविणं ददामि " देवी उक्तीच्या विवरणकाळी ही गोष्ट स्पष्ट करण्यात आली आहे. अग्नि, सूर्य, इंद्र हे "द्रविणोदा" शक्ती असणारे देव आहेत. "वसुदा" शक्तियुत आहेत; हे वेदातील निरनिराळ्या उल्लेखावरून स्पष्ट केलेले आहे. ही झाली लौकिक जगातील स्पर्धा.

प्रस्तुत पांचव्या ऋचेत दिसून येणारी स्पर्धा, ज्ञानक्षेत्रातील आहे. याची प्रस्तावना सूक्ष्मपणे तिसऱ्या ऋचेतच आहे. " अहं चिकितुषी " ( चिकित्सिका, ज्ञानी म्हणजे मीच ! ) असा हा आत्मविश्वास, या पांचव्या ऋचेत आणखी स्पष्टपणे अभिव्यक्त होत आहे:

देव व मानव इच्छितात ती संपदा दोन प्रकारची असू शकेल. ( १ ) मूर्त; धनकनकादी स्वरूपातील; ( २ ) अमूर्त : तरी तात्त्विक स्वरूपाची ती संपत्ति, ही उभय संपदा ' विद्या ' या संज्ञेने वेदात निर्देशिली जाते. " विद् " आख्याताने बनलेल्या " वित्त " " वित्ति " या साधित पदांमध्ये प्रारंभी या दोन्ही प्रकारची संपदा ( संपत्ती ) अंतर्भूत होत होती. " वेत्तारः "– " वेतृ " = ज्ञानी ( श्वेताश्वतर उपनिषद् ), " वेदार्थः " यातही "ज्ञानी" हाच अर्थ आहे, मूळ " विद् " या आख्याताचे दोन विभाग होऊन " विद्–विंद्, " संपादन-करणे, मिळवणे ( मूर्त स्वरूपाची संपदा ) ' विद् ' संपादन करणे, मिळवणे, जाणणे ( अमूर्त अनुभव, ज्ञानरूपी संपदा=विद्या ) अशाप्रकारे जीवनक्षेत्रातील दोन प्रकारची संपादना सुचविणारे दोन निराळे आख्यात रूढ झाले, पण सर्व प्रथम विद्–विन्द् व केवळ विद् हे आख्यात निराळे नव्हते; ( originally identical ) एकच असावे असे मो. विलियम्स यांचेही मत आहे. ( यांचा संस्कृत कोश पहा ).

वेदकालीन जीवनादर्शात संपूर्ण (उभयार्थी) विद्या (संपदा) अपेक्षित होती. पण उपनिषद्काली, 'विद् (विन्द) ' आख्याताने अभिप्रेत असणारी संपदा त्याज्य ठरू लागली. पूर्वी वैदिक ऋषी, अग्नीला ' जात–वेद ' म्हणून संबोधित असत. कारण हा अग्नि ' द्रविणोदा ' आहे, त्याप्रमाणे हा ' अग्निः होता कविः क्रतुः ' आहे. व ' अग्निः धिया स चेतति ( III·११·३ ); मनीषी सुद्धा आहे. अशा प्रकारे मूर्त व अमूर्त दोनही प्रकारची संपदा ( संपत्ती ) इच्छिणाऱ्या ऋषींना अग्नी ' जातवेद ' दिसला. ' वेद '– ' विद्या ' यांत ऐहिक व तात्त्विक उभय स्वरूपाची संपत्ती अभिप्रेत होती. पण मूर्त–ऐहिक संपत्ती भवबंधनास कारण होते, असा विचार उपनिषत्काली बळावू लागला. म्हणून विद्येत दोन प्रकार कल्पिणे अनिवार्य झाले. विद्या ( अमूर्त संपदा, तात्त्विक ज्ञान ); व अविद्या ( मूर्त संपदाः धनकनकादि स्वरूपातील संपत्ति); प्रारंभी 'अविद्या ' संकेताला ' अज्ञान ' असा अर्थ नव्हता. ईशावास्य उपनिषदाच्या ' अविद्यया मृत्युं तीर्त्वा ' या वाक्यातील ' अविद्या ' पदाला ' अज्ञान ' असा अर्थ जमत नाही. संपत्तीच्या ( अविद्या ) योगें मानव मृत्यु ( लोकां ) तून तरतो; विद्येने अमृतत्त्व मिळवतो असा तेथे अर्थ आहे असे दिसते. या उपनिषदात ऐहिक जीवन पापमय असल्याची धारणा कोठेही दिसत नाही. शतायुषी होण्याची आकांक्षा यात स्पष्ट आहे, परंतु हे जगणे भोगविलासाचे नव्हे; त्यागातच भोग ( आनंद ) मानून, लोकहितेरत परम–अर्थाचे जीवन येथे अभिप्रेत आहे. ॐ काराला यजुर्वेदात ( ईशावास्यात ) स्पष्टपणे प्रवेश मिळाला आहे. तरी पण मांडूक्योपनिषदातील संन्यासमार्गीयांचा हा ॐकार नव्हे ! या उपनिषदात सूर्य व अग्नी या दोघांचीही आराधना– प्रार्थना आहे. अग्नि व सूर्य उपासनेत धी व संपत्ती या उभय संपदांची सिद्धी अपेक्षित असते. पण ही उपासनापद्धती मागे पडते; ऋषिसंप्रदायात शैथिल्य डोकावते. मुनिपंथ बळावतो ऋषी व मुनी समानार्थी शब्द होऊ पाहतात; पुढे थोडयाच अवधीत ऋषिपरंपरा लुप्त होते, मुनि संप्रदाय फोफावतो.



अनुक्रमणिका






याचे पडसाद या अंभृणी सूक्तात जागोजागी कानी येतात. ही देवी 'अहं चिकितुषी' म्हणून सांगते; 'अहं द्रविणं दधामि' म्हणते. 'जातवेद' अग्नीचे हे उभयविध सामर्थ्य आपणात आहे, असे ही देवी सुचवीत आहे. तसेच मी चाहीन त्याला ' ब्रह्माणं कृणोमि ' ; 'ऋषिं कृणोमि' 'सुमेधसं कृणोमि' म्हणते. म्हणून या देवीला ' वागांभृणी ' असे म्हणण्याचा प्रघात दिसतो. पण ही विविध शक्तियुत देवी आहे, केवळ ज्ञानदेवी नव्हे. वेदांतच सरस्वती नामक एक देवी आहेच; शिवाय ' वाक् ' देवी पण आहे ! ही अंभृणी देवी ' तं ब्रह्माणं कृणोमि ' म्हणते खरी, पण या देवीच्या कृपेने मिळणाऱ्या या ' ब्रह्म ' सिद्धीचे स्वरूप काय ? हा एक महत्त्वाचा प्रश्न आहे. या देवीचे हे ' ज्ञान ' व ही ' ब्रह्म ' सिद्धी ऋग्वेदातील विचारांच्या चौकटीत सामावते काय, असा प्रश्न येथे डोकावतो !

ऋग्वेदातला ' ब्रह्म ( णस्पति ) ' यज्ञपरिसरातला आहे. म्याकडोनेल् यांना हा अग्नीसारखा वाटतो. (There are several passages in which Brahspati appears identified with Agni. ' Vedic Mythology p. 102 ). पण आपःरस स्वरूपी अंभृणीपासून मिळणारी ही 'ब्रह्म' सिद्धी, ' तज्जलानिति ' या छांदोग्योपनिषदांतील 'ब्रह्म'– सूत्रात बसणारी आहे. हे 'ब्रह्म' व हे ' ब्रह्मणत्व ' प्राप्त झालेली व्यक्ती, अन्याराधकांच्या संप्रदायातील 'ब्रह्म' व ' ब्रह्मा' असणे शक्य नाही. 'ब्रह्म' सिद्धीचा हा पंथ ऋग्वेदात नव्यानेच डोके वर काढीत असलेले दिसत आहे. चौथ्या मंडळातील वामदेवाच्या बोलातील सिद्धावस्थेची ही चुणूक अजून अस्पष्ट रीतीने अभिव्यक्त होत आहे. पण दहाव्या मंडळात, हा नूतन ' ब्रह्म ' संप्रदाय जास्त स्पष्टपणे निदर्शनास येत आहे. ' हा ब्रह्म' पाण्याच्या परिसरातला दिसतो. देव–जनन सूक्तात एक ब्रह्मणस्पती येतो. ( X. ७२·२) देव पाण्यात आनंदात आहेत. पण एक धडपडया अंश ( **तीव्रो रेणुः** ), त्या **आनंदमय परिसरातून बाहेर निघतो;** तेच ' **मार्तंड** ' होय. या सूक्तातील एकूण आशय पाहता, यातील ब्रह्मणस्पतीचे स्वरूपही लक्षात येणार आहे. 'अदः सलिले **सुसंरब्धाः** अतिष्ठत। अत्रा वो **नृत्यतां इव**' अशा आनंदात नाचत बागड पाण्यात असावयाचे सोडून बाह्य जगात–या संसारचक्रात येऊन पडणाऱ्या अंशाला ( सूर्याला ), ' मार्तंड ' म्हटलेल्यातही, उद्देश असल्याचे उघड होत आहे. मृत अंडापासून झालेला तो मार्तंड, म्हणून या शब्दाचे विवरण केले जाते. हा मृत्युलोक. सूर्य पाण्यातून मृत्युलोकात येऊन जन्म-मरण चक्रात सापडतो, असा या ऋचेतील व्यंग्यध्वनी दिसतो. यावरून ऐहिक जीवन हे भवबंधन आहे; असा सूर येथे उमटत आहे. आणि अशा या सूक्तात येणारा हा ब्रह्मणस्पती, याजक संप्रदायातील प्रवृत्तिपर वैचारिक भूमिकेतला होय, असे म्हणणे समंजस होत नाही. ' ब्रह्म ' हे पाण्यात असल्याचा उल्लेख, अथर्ववेदीय गोपथ ब्राह्मणात येतो. ( I. १-४ ). या संदर्भात केनोपनिषदातील ' तत् वनम् ' हे, गुह्य संकेतात्मक साररूप वचन उद्बोधक होणार आहे.

हा थोडा विस्तार एवढ्याकरता की, या अंभृणीदेवीच्या कृपेने लाभणारी ही ' ब्रह्म 'सिद्धी ऋग्वेदातील मूळ याजक संप्रदायाशी सुसंगत नाही; आणि ही प्रवृत्तिपरही नाही. ही ब्रह्मसिद्धि, उपनिषदातील ' ब्रह्म ' कल्पनेशी जुळती मिळती आहे. ' तत् जलानिति, ' 'तद्-वनम् ' यासारखेच 'अंभृणी' हे नामही सांप्रदायिक रहस्यार्थाने भरलेले आहे. सायणांनी सांगितलेल्या सांप्रदायिक कथेप्रमाणे या देवीचे नाव ' वाक् ' होय ! या ' वाक् नाम्नी ' विदुषीच्या वडिलांचे नाव 'अंभृणी ' असे होते. अंभृणी ऋषीची कन्या, म्हणून ही आंभृणी होय. अशा प्रकारे, या देवीचे संपूर्ण नाव ' वागांभृणी ' ठरते. पण सायणानी दिलेली कथा, पूर्णपणे जमेस धरली तर 'अंभृणी' यातील नाम-रहस्यास मुकावे लागते ! मूळ साक्षात्काराचे प्रतिबिंब, त्या दैवताच्या मूळ नामात सामावलेले असते. यामुळेच संप्रदायात देवता नाम हे त्या दैवताची शब्दरूपी ' **प्रति-मा** ' म्हणून गणली जाते. उस्नर् या जर्मन् संशोधकाने ग्रीकदैवतांच्या तुलनात्मक अभ्यासात, हे सूत्र साधार मांडल्याचे, ( गिल्बर्ट मरी, क्लासिरर् यांच्या कृतज्ञतापूर्वक उल्लेखावरून ) कळते. खरोखर या देवीचे ' वाक् ' हे मुख्य नाव होऊ शकत नाही. कारण ही नाना शक्तियुत देवी आहे. अशा शक्तीपैकी 'वाक् ' एक अंश आहे. ही खरोखर

'वीरा' आहे. ज्ञान्याच्या बोलीत हा आवेश, हा 'अहं' संपूर्णपणे विसंगत होणार आहे. या देवीचे हे पाणी निराळे आहे. म्हणून 'वाक्' हे नाव या देवीचे मूळ दर्शन घडवण्यास उपयुक्त ठरत नाही. बापावरून प्राप्त झाले असे वाटणारे 'आंभृणी,' किंवा मूळ 'अंभृणी' एवढाच भाग पुरेसा आहे. या देवीच्या आत्मनिवेदनातील '**अप्सु अंतः समुद्रे**' या मूळ स्वरूपाचे प्रतिबिंब 'अभृणी' या नामात साठवलेले आहे. 'नाम हेचि रूप; रूप हेचि नाम' ही संतांची पारंपरिक श्रद्धा, उत्तरच्या संशोधनाला पाठिंबा देत आहे. शब्द ( नाम ): आकृति ( form ); तर त्यातील अर्थ हा आशय ( Content ) होय. म्हणून साधकाला 'नाम' हे साक्षात दैवताच्या स्थानी वाटते. यामुळे 'वागांभृणी' या कथाविषयात त्या देवीचे दर्शन घडविण्यास समर्थ असा शब्दसंकेत 'अंभृणी' हाच होतो. अंभस्–अंबु, अंब या शब्दांना जलवाचक अर्थ आहे. मातृवाचक म्हणून गणलेल्या अंब पदाला, वेदात 'जल' वाचक अर्थ असल्याचे 'अदिति' देवीच्या विवेचनात निदर्शनास आले आहे ( जुलै अंक पाहा ). म्हणून या संदर्भात अंभृणी साक्षात् अंबा माता असल्याचे अनुमान निघत आहे. म्हणून अंभृणी : अंबा हे नामरूप या संप्रदायातील सर्वप्रथम दर्शनातील ( Gestalt ) खुणांची स्मृती जागृत करणारे आहे असे म्हणावे लागते. स्नान-पूजादी क्रिया ( ritual ) प्रमाणे, नामस्मरणही आदिदर्शनाच्या पुनःप्रत्ययाच्या घडपडीचे निदर्शक आहे. आणि अंभृणी देवीच्या ध्यानधारणादि उपासनेने प्राप्त होणारे हे 'ब्रह्म'– हा साक्षात्कार इंद्राग्नी पूजकांच्या सिद्धीहून फार निराळा वाटतो.

सायणांनी दिलेली या देवीची सांप्रदायिक कथा आणखी एका निराळ्या रीतीने उपयुक्त आहे. आप : रस स्वरूपी ही देवी आपले चरित्र आपणच सांगते म्हणजे काय ? ते कसे शक्य ? 'परोक्षप्रिया वै देवाः' तर ही देवी प्रत्यक्ष बोलते म्हणजे काय ? एका व्यक्तीच्या अंगात येते; व ती व्यक्ती (देव होऊन ) बोलू लागते. "अहं रुद्रेभिः वसुभिः चरामि" असे सांगणारी व्यक्ती कोण ? असा प्रश्न उद्भवतो. या शंकेच्या समाधानाकरता ही वरील पारंपरिक कथा आवश्यक झालेली दिसते आणि या कथेतही, सूक्ष्मपणे सांप्रदायिक महत्त्वाचे ( अंभृणी ) नाम त्यात गोवून ठेवले आहेच. शिवाय ही देवी 'कुमारी' असल्याची सूचनाही. ही 'ऋषिकन्या' या अडाख्यात दडलेली आहे. [ या सूक्तातच पुढे 'अहं पितरं सुवे' असे ही देवी सांगते ! त्या कोडेवजा वाक्यात, ही कन्यका परमेश्वरी असल्याचे दिसते (७) ]

'ब्रह्म'सिद्धिदात्री या देवीवर, केनोपनिषदातून काही विशेष प्रकाश पडत असलेला दिसतो. अंभृणी सूक्तातील आशयच, केनोपनिषदांतील कथेत अजून उघडपणे प्रकट झाला आहे. अंभृणी सूक्तात 'इंद्राग्नीना पोसणारी मी,' 'मी त्यांची भर्त्री' असे ही देवी म्हणते. तर केनोपनिषदातील यक्ष-प्रश्नात इंद्र, अग्नी पराजित होऊ फजीत पावले आहेत ! समोर उभे ठाकलेले 'गूळ्हं गभीरम्' –'यक्ष' हे काय : 'किम् इदं यक्षम्' असा प्रश्न केला जातो. अग्नी, दिङमूढ व हतबल झाल्याचे वर्णन येते. या कथारचनेतही प्रचारकी साहित्यतंत्र प्रत्ययास येते. वेदातील कवीना अग्नीची स्तुती करण्यात खूप स्फुरण येत असावे. अग्नीला 'जातवेद' म्हणून संबोधण्यात या देवाविषयीची त्यांची श्रद्धा जागोजाग पुरेपूर व्यक्त होते. केनोपनिषदातील कथाकाराने नेमका या मर्मस्थानावरच घाव घातला आहे ! हे अग्ने, तू जन्मतः ज्ञानी, सर्व जाणणारा जातवेद ना ? तर, हे समोर दिसते ते (यक्ष ) काय सांग ? पण या 'जातवेदाची बोबडी वळते !' 'हे अग्ने तू सर्वदहन समर्थ ना ? तर ही काडी जाळ' पण अग्नीला तेही जमत नाही ! अंभृणी सूक्तात हा 'भृत्य' होतो; तर या उपनिषदात 'जित' ठरतो ही झाली अग्नीची कथा.

पूर्वी वेदातील विजयीवीर इंद्र, शेवटी अंभृणीचा हस्तक झालेला पाहिला. केनोपनिषदात हा महापराक्रमी पराजित होऊन, उभा असतो. अशावेळी 'उमा हैमवती' नामक देवी त्याला दिसते. व या हैमवती कडून ( तिच्या कृपेने ) इंद्राला 'ब्रह्म' स्वरूप ज्ञान होते. अशी ती कथा आहे. 'यं कामये तं ब्रह्माणं कृणोमि' असे अंभृणी देवीने म्हटलेले वाक्य आठवावे; म्हणजे केनोपनिषदातील इंद्राला







'ब्रह्म' ज्ञान देणारी 'हैमवती' उमा व वेदातील अंभृणी यांच्यातील साम्य लक्षात येते. आणि 'हैमवती' हा संकेत, रहस्यार्थयुक्त असल्याचे दिसते. 'कस्मै' देवता सूक्तात 'हिमवन्तः'चा उल्लेख आहे. या ठिकाणी 'हिमवन्तः' हा बहुवचनार्थी शब्द का? असा प्रश्न उत्पन्न होतो. सायणांच्या मते 'हिमवन्तः' हा अनेक पर्वत, या अर्थाने वापरलेला शब्द होय. सर्व पर्वतातून हिम असते असे नाही; पण ओहोळ, नद्या वगैरे स्रोतांचे उगमस्थान-म्हणजे पाण्याचे आगर-पर्वत, असा आशय, 'हिमवन्तः' या (पर्वतवाचक) शब्द योजण्यामागे असावा असे दिसते. म्हणून ही 'हैमवती'च पुढील काळी, पुराणांतरी पार्वती गिरिजा होते! संकेत बदलतात, तेव्हा 'समय' (काल) बदललेला दिसतो. ते असो. प्रस्तुत, उमादेवीला 'हैमवती' म्हणण्यात उद्देश आहे हें खास. आणि हिम=जल या संदर्भात, ही उमा, आपःरस स्वरूपी अंभृणी वर्गातली देवी आहे, असे सुचविण्याकरताच या ठिकाणी 'हैमवती' संकेताची योजना केली नसेल काय? आणि शेवटी 'तद्वनम्'ची उपासना सांगणाऱ्या या केनोपनिषदात, 'उत्तान पद=वृक्ष, व देवता ज्या सलिल गर्भात आहेत असे (अदितिरूपी) जलाशय, यांचे साहचर्य असलेल्या एका भव्य दृश्याची स्मृती येथे चाळवली जात आहे, यात शंका नाही (ऋग्वेदातील X. ७२ सूक्त पाहा.)

'ब्रह्म' सिद्धीस एका 'ब्रह्माणी'कडून दीक्षा घेणे अवश्य आहे; असा एक सांप्रदायिक दंडक असल्याचे कळते. श्रीरामकृष्णांना शेवटी एका भैरवीकडून दीक्षा जरूर वाटली व ते तशा ब्राह्मणीची मार्गप्रतीक्षा करीत होते. व शेवटी त्याना इष्टप्राप्ती झाली. 'श्रीरामकृष्णलीला प्रसंग' या ग्रंथात स्वामी शारदानंदानी ही गोष्ट विशद केली आहे. आजही प्रचलित असलेल्या या श्रद्धेची मुळे ऋग्वेदातील अंभृणीसूक्तात दृष्टीस पडतात! वेदातील अत्यंत प्रमुख इंद्राग्नींना गौण बनविणारा हा देवी संप्रदाय हा ब्रह्मसिद्धीचा प्रकार, व हे यांचे सर्व तंत्र, याजकप्रक्रियेहून संपूर्ण भिन्न असलेले दिसत आहे. हा संप्रदाय वेदपूर्वकालीन मूल भारतदेशीय जनांचा असावा असे बऱ्याच आधुनिक संशोधकांचे मत असून, त्यांत बरेच तथ्य आहे असे अंभृणी सूक्तावरूनही दिसते.

---





अनुक्रमणिका








प्रा. सौ. अनुराधा मोहन आचार्य

# भारतापुढील अन्नप्रश्न : एक चक्रव्यूह

## आणीबाणी व अन्नप्रश्न

सांप्रतच्या काळात सरहद्दीवरील युद्धाइतकेच जवळजवळ महत्त्व असलेला विषय म्हणजे भारतापुढील अन्नप्रश्न. कारण जवानांच्या पराक्रमाबरोबरच पुरेशा अंतर्गत अन्नधान्यपुरवठ्यावरच आपल्या यशाची मदार आहे. पण दिवसेंदिवस अन्नसमस्या मात्र बिकट होतेच आहे. रौद्ररूप धारण करते आहे. ज्याच्या-त्याच्या तोंडी हाच विषय. ध्यानीमनी स्वप्नी एकच विचार की आपल्यापुढे आ वासून ठाकलेला हा अन्नप्रश्न सुटायचा तरी कसा ? आणि केव्हा ? आणि हे एवढ्यावरच थांबत नाही. या कराल अन्नसमस्येच्या पोटी इतर अनेक आपत्ती जन्म घेतात व कधी न संपणारी त्यांची एक मालिकाच तयार होते. हल्ली-हल्लीचीच उदाहरणे द्यायची झाली तर सबंध महाराष्ट्र राज्यात जागोजाग १९, २० ऑगस्ट १९६५ पासून सुरू झालेली भूकबळीविरुद्धची मोहीम, ठिकठिकाणी झालेले मोर्चे, निदर्शने हे सर्व हेच दर्शवीत नाहीत काय ? उपासमारीच्या पोटी लुटालूट केली गेली, ती थांबविण्याकरिता गोळीबार केला गेला, त्यात अनेकजण बळी पडले. प्रकरण अधिकच चिघळले, ही मोहीम बंद पाडण्याकरिता अनेकांची तुरुंगात रवानगी झाली. सामान्य जनतेच्या मनात सरकारबद्दल एक प्रकारचा कडवेपणा निर्माण झाला, युद्धकाळात जे व्हायला नको होते तेच नेमके झाले. जे महाराष्ट्रात झाले, तेच कलकत्त्यात झाले, तेच इतर अनेक ठिकाणी लहानमोठ्या स्वरूपात झाले. हे असे का झाले ? लोकांना आपले नित्यनेम सोडून निदर्शने काढण्याची, गोळीबाराला तोंड देण्याची, त्यात बळी पडण्याची हौस का होती ? अगदी शेवटचा उपाय, निकराचा प्रयत्न म्हणून तर लोकांनी हे केले ना ? भुकेने मरण्यापेक्षा गोळीला बळी पडणे तर त्यांना अधिक श्रेयस्कर वाटले नसेल. या थराला गोष्टी येण्याइतका खरोखरच हा प्रश्न बिकट आहे का ? सरकार विरुद्ध जनता असे कुरुक्षेत्राचे स्वरूप भारतात आणण्याइतका अन्नप्रश्न गहन आहे का ? या कुरुक्षेत्रावरील हा अन्नप्रश्नाचा चक्रव्यूह भेदण्यास आजचे सरकार असमर्थ आहे का ? आज, शांती आणि स्थैर्य हे फार महत्त्वाचे प्रश्न आहेत. कारण भारतातील स्वातंत्र्य केवळ युद्धविराम रेषेच्या अलिकडे पलीकडे चाललेल्या युद्धप्रयत्नांवरच अवलंबून नसून या प्रश्नाच्या यशस्वी सोडवणुकीवरही तेवढेच अवलंबून आहे. कारण सरहद्दीवर युद्ध चालू असताना देशात शांतता टिकवायची असेल तर मूलभूत गरजा तरी भागल्या पाहिजेत. लोक आणीबाणीची परिस्थिती पाहून कोंड्यालाच मांडे मानून घेतील पण कोंडा तरी पाहिजेच की नाही ? आणि म्हणूनच या प्रश्नाचे खरे स्वरूप काय आहे हे पाहणे अत्यंत जरूरीचे आहे.

## अन्नप्रश्न नेहमीचाच

आपल्यापुढील अन्नप्रश्न हा अचानक कुठूनतरी धूमकेतूसारखा उद्भवलेला नसून आज अनेक वर्षे भारताचा पिच्छा पुरवीत आहे. याबद्दलची चर्चाही सतत चालू आहे. कुणी त्याला कूट-प्रश्न म्हणतात, कुणी भारताला लागलेले असाध्य दुखणे म्हणतात, कुणी काही कुणी काही . सामान्यतः आपण नेहमी जेव्हा अन्नप्रश्नाचा विचार करतो तेव्हा साधारणपणे आपण अन्नधान्याच्या टंचाईचाच मुख्यत्वेकरून विचार करीत असतो. आणि ही टंचाई भारतासारख्या शेतीप्रधान राष्ट्राच्या दृष्टीने थोडीशी विचित्र असली तरी तितकीच खरीही आहे. एकूण मागणीपेक्षा पुरवठा आपल्याकडे कमीच ही सूर्यप्रकाशाइतकी स्वच्छ गोष्ट आहे. चालू शतकात तर दिवसेंदिवस ही परिस्थिती गंभीर होत चालली आहे, त्याला कारणेही स्पष्ट आहेत. विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात भारताची लोकसंख्या ५२% नी वाढली, पण अन्नधान्याच्या वाढीची गती मात्र त्याहून कितीतरी पटीने कमीच होती, शिवाय १९३६ पासून ब्रह्मदेश भारतापासून

तोडला गेल्यामुळे तिकडूनही अन्नपुरवठ्यात कपात झाली. देशाच्या फाळणीने या सर्वांवर कळस चढविला. परिणाम एकच झाला. दिवसेंदिवस मागणी शीघ्रगतीने वाढत आहे; पुरवठ्याची गती मात्र गजगतीच आहे. मागणी ३.६५ टक्के दरसाली वाढते, उत्पादनाचे तसे नाही आणि फार मोठ्या प्रमाणावर धान्याची आयात (दरवर्षी ६ ते ७ दशलक्ष टन) मात्र करावी लागते. १९६४ मध्ये २६६.२५ कोट रु. धान्याची आयात करूनही वाढत्या मागणीला तोंड देणे सरकारला अशक्यप्राय होऊन बसले आहे. शिवाय आणीबाणीच्या परिस्थितीत हा पैसाही परदेशी जातो. तोच एरवी आपल्याला शस्त्रांची आयात करण्यास उपयोगी पडेल, शिवाय पंचवार्षिक योजनेमुळे लोकांच्या हातात खेळणारा पैसा वाढतो तशी मागणी पण वाढणार आणि हा प्रश्न अधिकच बिकट करणार. पण हे झाले अन्नप्रश्नाचे एक अंग, हा प्रश्न एवढ्यावरच थांबत नाही; त्याच्या इतरही बाजूचा विचार तो प्रश्न सर्वार्थाने सोडवायचा असल्यास करावयास हवा. कारण तो बहुरूपी, अनेकरंगी प्रश्न आहे. आता हेच पहा ना, मागणीपेक्षा पुरवठा कमी आहे हे तर झालेच पण शिवाय जे अन्न दर माणशी उपलब्ध आहे ते इतर राष्ट्रांशी तुलना करता कमी प्रतीचे आहे. ते चौरस आहार तर पुरवू शकत नाही पण अनेकवेळा किमान गरजाही भागवू शकत नाही. फूड अँड अॅग्रीकल्चरल आर्गनायझेशनच्या रिपोर्टप्रमाणे दरमाणशी उपलब्ध अन्न खालील वेगवेगळ्या देशात पुढे दिलेल्या कॅलरीज निर्माण करू शकते. (किमान गरजा दर माणशी २००० कॅलरीज) :

| | |
|---|---|
| अमेरिका | ३१२८ |
| कॅनडा | ३०६२ |
| भारत | १६२१ |

हे असे व्हायला अनेक कारणे आहेत पण सारांश एवढाच की पुरवठा गरजेपेक्षा कमी आहे एवढेच नव्हे तर तो कमी प्रतीचाही आहे.

## साठेबाजीची प्रवृत्ती

शिवाय अन्नप्रश्नाचे आणखी एक महत्त्वाचे रूप आहे. आपल्या एकूण गरजेपेक्षा भारतात कमी पिकते हे जरी खरे असले तरी जे पिकते ते सर्वच्या सर्व बाजारात विक्रीसही ठेवले जात नाही. जे पिकते ते समप्रमाणात वाटले जात नाही. तर त्यातले बरेचसे जास्त नफ्याच्या आशेने गोदामातून साठवून ठेवले जाते व बाजारात मात्र सामान्य जनतेच्या दृष्टीने अधिकच टंचाई निर्माण होते. अगदी हल्लीचेच उदाहरण घ्यायचे झाले तर ऑगस्ट २९ ला पिटीआयने (P. T. I.) प्रसृत केलेल्या एका रिपोर्टप्रमाणे भारतात अन्नोत्पादन हळूहळू का होईना पण गेल्या चार वर्षात वाढते आहे. गतवर्षी ८८.४ दशलक्ष टनाचा उच्चांक या बाबतीत गाठला गेला आहे. पण बाजारात विक्रीसाठी येणाऱ्या साठ्यात मात्र ३० ते ३८ टक्यांची कपात झाली आहे आणि या परस्परविरोधी गोष्टींची सांगड फक्त एकाच तऱ्हेने घालता येते आणि ती म्हणजे फार मोठ्या प्रमाणावर बड्या व्यापाऱ्यांनी भावी नफ्याच्या आशेने केलेली साठेबाजी. सरकारनेही अशी साठेबाजी केली जाते हे उघड मान्य केले आहे. त्याविरुद्ध कडक उपाययोजना करण्याचेही जाहीर केले आहे. या सर्वाचा एकवटून परिणाम काय होत असेल तर तो म्हणजे भलत्या प्रमाणात होणारी किंमतवाढ. सरकारी किंमत निर्देशांकच ( official all India price index ) अतिशय मोठी किंमतवाढ जुलै ७ ते ऑगस्ट ७, १९६५ या एका महिन्यात दर्शवितो. त्या किंमतवाढीला आळा घालता येण्याचा सर्वोत्तम उपाय म्हणजे सरकारी नियंत्रित दुकानातून धान्यपुरवठा करणे. पण तिथेही परिस्थिती फारशी आशादायक नाही. अनेक सरकारी नियंत्रित दुकानातून सुद्धा योग्य त्या प्रमाणात पुरवठा होत नाही. त्यामुळे आणि दुकानेही पुरेशी नसल्यामुळे आळा घालणे दूरच राहिले पण बराचसा वेळ रेशनच्या दुकानांसमोर रांगा लावण्यातच जातो. ही टंचाई, भराभर वाढणाऱ्या किंमती, हीच अंतर्गत अशांततेची फार मोठी बीजे होत. ही अंतर्गत अशांतता चालू युद्धाच्या दृष्टीने अतिशय धोक्याची आहे. आणि लवकरात लवकर हा प्रश्न सोडविणे त्यामुळे फार महत्त्वाचे आहे. त्याकरता अनेक प्रकारचे उपाय सांगितले गेले आहेत, जात आहेत, पण चालू परिस्थितीत सर्वात उत्तम उपाय कोणते हे पाहण्यापूर्वी आतापर्यंत सरकारने या दृष्टीने काय काय केले हे पहाणे योग्य ठरेल.



अनुक्रमणिका








### केलेल्या उपाययोजना

दुसऱ्या महायुद्धापर्यंत या गोष्टीकडे सरकारने कधीच आस्थापूर्वक लक्ष दिले नव्हते. नंतरच्या बंगालच्या दुष्काळामुळे या बाबीचा गंभीरपणे विचार करणे क्रमप्राप्तच झाले. १९४३ साली 'अधिक धान्य पिकवा' मोहिमेच्या पहिल्या पर्वाला प्रारंभ झाला व थोड्याफार फरकानिशी पहिल्या पंचवार्षिक योजनेपर्यंत तीन वेळा ही मोहीम चालू ठेवण्यात आली. पहिल्या पंचवार्षिक योजनेच्या कालखंडात निसर्गाच्या मदतीमुळे आणि आतापर्यंत केलेल्या मानवी प्रयत्नामुळे भारताच्या आर्थिक इतिहासात पहिल्यांदाच अन्नप्रश्न सुटण्याची चिन्हे दिसू लागली, पण ही सुवत्ता किंचित्कालच टिकली. दुसऱ्या पंचवार्षिक योजनेंत या प्रश्नाने परत डोके वर काढले आणि तेव्हापासून आतापर्यंत हा प्रश्न प्रश्नच राहिला आहे. याचा विचार करण्यासाठी अशोक मेहतांच्या अध्यक्षतेखाली फूडग्रेन्स अेन्क्वायरी कमिटी नेमण्यात आली, त्या कमिटीने बऱ्याच सूचना केल्या. त्यातल्या काही अंमलातही आणल्या. शिवाय १९५७ मध्ये सबंध देशाची गव्हाच्या पुरवठ्यासाठी पाच भागात आणि तांदुळाच्या पुरवठ्यासाठी दोन विभागात विभागणी करण्यात आली. पुढे या विभागाची संख्या वाढविण्यात आली. किमान आणि कमाल किंमती ठरविण्यात आल्या. दुकानदारांना परवाने देण्यात आले, सरकारनियंत्रित दुकाने धान्यवाटपासाठी काढण्यात आली. रिझर्व्ह बँकेनेही आपल्या आयुधांनिशी धान्याच्या वाढत्या किंमतींना आळा घालण्याचा प्रयत्न केला. सरकारने शेवटी धान्यवाटपाचे काम बऱ्याच प्रमाणात अनेक राज्यातून आपल्याकडे घेतले पण तरीही किंमती दिवसेंदिवस वाढतच आहेत. मागणीपेक्षा पुरवठा कमीच आहे. पंचवार्षिक योजनेत वाढणारे धान्योत्पादन या वाढत्या मागणीला पुरे पडत नाही म्हणून मोठ्या प्रमाणात धान्याची आयात कशी केली जाते हे खालील आयातीच्या आकड्यावरून दिसून येईल :

| | |
|---|---|
| १९५८ | ३.१७ दशलक्ष टन |
| १९५९-६० | ३.८ „ „ |
| १९६०-६१ | ५-०५ „ „ |

शिवाय पी. एल्. ४८० च्या कराराखाली फार मोठ्या प्रमाणात गव्हाची आयात केली जात आहेच. पण सर्व करूनही शेवटी पुरे पडत नाहीच हे सुरुवातीला वर्णन केलेल्या परिस्थितीवरून दिसून येईलच. पण ही परिस्थिती ताबडतोब आटोक्यात आणणे सर्वच दृष्टीनी इष्ट आहे. मागून आणलेले अन्न किती दिवस पुरणार? धान्योत्पादनाच्या बाबतीत स्वयंपूर्णता मिळविल्याशिवाय भारत राजकीयदृष्ट्या जरी स्वतंत्र असला तरी इतर बाबीत परतंत्रच राहाणार. शिवाय खऱ्याखुऱ्या अर्थाने स्वतंत्र राहायचे असेल तर स्वयंपूर्णता हा एकच मार्ग. प्रत्येक राष्ट्रापुढे एक अशी वेळ येते की तेव्हा ' करा अथवा मरा ' हेच तत्त्व अटळ होते तीच वेळ आपल्यापुढे आहे आणि त्यामुळे बेभरवशाच्या आयातीवर विसंबून राहण्यापेक्षा निदान १० टक्के तरी उत्पादनात वाढ घडवून आणल्याशिवाय आपल्याला तरणोपाय नाही.

यावर्षीसुद्धा उशीरा सुरू झालेल्या पावसामुळे, उत्तर हिंदुस्थानातील पुरामुळे खरीप पिकांचे बरेच नुकसान झाले आहे. शिवाय धान्याच्या मोठ्या प्रमाणावरच्या आयातीची शक्यताही नेहमीइतकी आशादायक नाही. कारण आपला या बाबतीतला सर्वात मोठा दाता देश म्हणजे अमेरिका. पण हल्लीच्या एकूण बिघडलेल्या भारत-पाक संबंधात आपल्याला पूर्वीसारखीच मोठ्या प्रमाणावर अमेरिका मदत करील की नाही याबद्दल साशंकताच आहे. आणि हल्लीच्या काही बाबींवरून नजीकच्या भविष्यकाळात तरी मदतीवर विसंबून राहाणे मूर्खपणाचेच ठरणार आहे. आणि त्यामुळेच प्रथमतः एक लाखापेक्षा जास्त वस्तीच्या सर्व शहरातून धान्य नियंत्रणे बसवण्याचे जाहीर करण्यात आले आहे. धान्यवाटपाचे काम बऱ्याच प्रमाणात सरकारी नियंत्रणाखाली येत आहे आणि नंतर इतरत्रही या दृष्टीने पावले टाकण्यास सुरुवात करण्यात येणार आहे. ४२ दशलक्ष लोक पहिल्या योजनेखाली व ५० दशलक्ष नंतरच्या योजनेखाली येतील. याकरता सरकारला ३.५ दशलक्ष टन तांदूळ व ४ दशलक्ष टन गहू पुरवावा लागेल. अंतर्गत धान्याच्या जोडीला आयात केलेल्या धान्याची पण मदत घेतली जाईल. पण तरीही कमी पडल्यास सबंध देशभर तेवढ्या प्रमाणात प्रत्येक भारत-

वासीयाला कपात सहन करावी लागेल आणि म्हणूनच हल्ली पंतप्रधान शास्त्रींनी सोमवारचा उपास करण्याचे जे आवाहन केले आहे ते या संदर्भातच आहे.

ही योजना नीट पार पाडण्याकरता मुख्य गरज आहे ती सरकारपाशी असाव्या लागणाऱ्या धान्याची. धान्याच्या मोठ्या प्रमाणावरच्या आयातीची शाश्वती नसल्यामुळे व बाजारात येणाऱ्या धान्याचे प्रमाण गेल्या काही वर्षांत सारखे घटत असल्यामुळे सरकारला या गोष्टीकडे जास्त लक्ष पुरवावे लागेल आणि याकरता शेतकऱ्याकडूनच धान्य सरकारकडे येण्याची योजना सरकारने आखली आहे. प्रत्येक राज्यातील मोठ्या शेतकऱ्याकडून ठराविक प्रमाणात धान्य सरकारी गुदामात भरले जाऊन तिथून त्यांचे वाटप सरकारी यंत्रणेद्वारा केले जाईल. आणि चालू परिस्थितीत हेच योग्य आहे. टंचाईच्या सद्यःपरिस्थितीत निदान ती टंचाई समप्रमाणात विभागणे एवढेच जास्तीत जास्त सरकारला शक्य आहे. 'ॲग्रीकल्चरल प्रायसेस कमिशन' च्या रिपोर्टमध्येही सरकारने धान्याचे साठे नफेबाजी करणाऱ्या व्यापाऱ्याकडून स्वतःकडे घेण्याकडेच लक्ष दिले पाहिजे हे स्पष्ट म्हटले आहे.

ज्या शहरातून सध्या धान्यवाटपाचे काम सरकारी यंत्रणेच्या देखरेखीखाली चालते तिथेही परिस्थिती फारशी समाधानकारक नाही. टंचाई दरदिवशी जाणवतेच, किंमतीही दिसामाशी वाढताहेत. भरीला भर म्हणून मारुतीच्या शेपटीसारख्या रांगा प्रत्येक धान्य दुकानासमोर दिसतात. त्यामध्ये बरेचसे चिडलेले आणि नैराश्याची स्पष्ट छाप तोंडावर दिसणारे ग्राहक मिळणाऱ्या तुटपुंज्या धान्यासाठी तासन्तास उभे असलेले दृष्टीस पडतात. या अनुभवांवरून संपूर्ण धान्यनियंत्रण आणीबाणीच्या परिस्थितीशिवाय सरकारने लादू नये म्हणतात त्यात बरेच तथ्य आहे असे वाटल्यावाचून रहात नाही. आणि त्यामुळेच प्रा. दातवालांच्या अध्यक्षतेखाली, ॲग्रीकल्चरल प्राईस कमीशनने आणि नंतरच्या राज्यसरकारच्या अन्नमंत्र्यांच्या बैठकीतसुद्धा संपूर्ण धान्यवाटप सरकारी यंत्रणेद्वारा करण्याचे अंगीकारण्यात आलेले नाही. कारण सद्यःपरिस्थितीत ते अशक्यप्राय आहे आणि रशियासारख्या देशानेही जे तितकेसे व्यवहार्य नाही म्हणून सोडले ते भारताने अंगिकारण्यात कसला शहाणपणा ? फक्त प्रत्येक राज्यसरकारला पुरेसे साठे करण्याची आज्ञा देण्यात आलेली आहे. ज्या राज्यसरकारांकडे गरजेपेक्षा जास्त पुरवठा आहे. त्यांनी टंचाई असलेल्या विभागांना पूर्वीपेक्षा सढळ हाताने मदत करावयाची आहे. आणि शेतकऱ्यांकडून सरकारी गुदामात ठराविक प्रमाणात धान्य भरण्यात यावे याविषयीही काही योजना आखण्यात आली आहे. फूड कॉर्पोरेशनचे कामही सुरू झालेले आहे. किंमती स्थिर ठेवण्यास लागतील तेवढे धान्याचे साठे करणे, ग्राहकांना योग्य किंमतीत धान्याचा पुरवठा करणे हेच या कॉर्पोरेशनचे काम होय. यासाठी अमेरिका, ऑस्ट्रेलिया, जपान यासारख्या प्रगत देशातूनही अशा प्रकारच्या सरकारी संस्था आहेत. ५० टक्के तांदुळाचा आणि गव्हाचा व १६ टक्के इतर धान्याचा व्यापार तरी सुरवातीला या कॉर्पोरेशनतर्फे होईल. शिवाय शेतकऱ्यांना उत्पादनवाढीसाठी कर्जाऊ रकमा देणे वगैरे कामे या कॉर्पोरेशनकडे असतील—म्हणजेच शेतकऱ्यांकडून धान्य मिळविणे, ते योग्य प्रकारे वाटणे नि साठे करणे एवढी तीन कामे मुख्यत्वेकरून कॉर्पोरेशनकडे असतील. किंमती वाढण्याची चिन्हे दिसू लागली की आपल्या साठ्यातून बाजारात धान्य पुरवठा करून किंमती स्थिर ठेवण्याचे काम कॉर्पोरेशनकडे राहील आणि ठराविक पातळीपेक्षा किंमत खाली जाण्याची चिन्हे दिसल्यास धान्याचे साठे विकत घेऊन किंमती ठराविक पातळीच्या खाली न घसरू देण्याची खबरदारी पण कॉर्पोरेशननेच घ्यायची आहे.

संपूर्ण धान्य-नियंत्रण करण्यापूर्वी सरकारला मात्र फार विचार करावा लागेल. १९५७ मध्येसुद्धा अशोक मेहता कमिटीने संपूर्ण धान्यनियंत्रणास तितकेसे उत्तेजन दिले नव्हते. कारण त्याकरता प्रथम सरकारजवळ भरपूर साठा पाहिजे. त्याकरिता सध्या तरी फार मोठ्या प्रमाणात आयात केली पाहिजे. एकदम हे लादल्यास सुरुवातीला तरी शेतकरी धान्य सरकारी गुदामात पूर्णपणे भरण्यास नाखूषच रहातील. शिवाय सरकारचा खर्चही भरमसाठ वाढेल, सरकारी यंत्रणेतील दोषांमुळे खोटी कार्डे नि चोरून धान्य आणण्याचे उद्योगही चालू राहतील आणि त्यामुळे










अगदी आणीबाणीच्या परिस्थितीशिवाय संपूर्ण धान्य वाटप सरकारी नियंत्रणाखाली तावडतोब आणणे तेवढेसे योग्य ठरणार नाही.

## मूलभूत उपाय कोणते ?

पण हा प्रश्न पूर्णपणे सोडविणे मात्र अशा प्रकारचे तुटकतुटक असंबद्ध उपाय योजून शक्य होणार नाही त्यासाठी शेतकऱ्यांचा शेतीकडे पाहण्याचा दृष्टीकोनच बदलावयास हवा. नुसते धान्योत्पादन वाढविणे हे ध्येय नसून संपूर्ण शेतकीव्यवसायाचे पुनरुज्जीवन झाले पाहिजे. त्यासाठी तरुण पिढी खेड्यातच राहिली पाहिजे; त्यांनी तिथे जातीने लक्ष दिले पाहिजे; हल्लीची प्रवृत्ती खेडी सोडून शहरांकडे येण्याचीच जास्त आहे त्याबद्दल त्यांना दोषही देता येत नाही. तिथे दिवस-रात्र मरमर मरूनही मूलभूत अन्नवस्त्र निवाऱ्याच्या गरजा पुरवता येत नाहीत. जन्मात कधी कामापासून सुटका नसते. इतर सर्व सोयीच्या दृष्टीने नन्नाचाच पाढा, मग त्यांना खेड्यात राहण्याचे आकर्षण तरी का वाटावे ? म्हणून त्यांना खेड्यातच राहावेसे वाटेल अशी परिस्थिती निर्माण करता आली तरच त्यांचे पाय तिथे टिकतील नि बऱ्याच अंशी हा प्रश्न सुटेल. मुख्यत्वेकरून मागासलेल्या देशात शेतीकडे उद्योगधंद्यांपेक्षा बऱ्याच प्रमाणात दुर्लक्ष केले जाते. पुरेसे भांडवल पुरविले जात नाही आणि हळूहळू शेतीची अनवस्था वाढत जाते आणि त्यामुळे उद्योग-धंदे पुढे गेले तरी शेती मागासलेलीच राहाते. हे असे होऊ नये म्हणून सरकारने जातीने लक्ष पुरविले पाहिजे. त्याकरिता योग्य त्या शिक्षणाची खेड्यातून व्यवस्था केली पाहिजे. कारण शेवटी अधिक धान्यो-त्पादनाचे अंतिम ध्येय गाठणे शेतकऱ्यांच्याच हाती आहे आणि त्याकरिता त्यांच्यातच योग्य ती सुधारणा घडवून आणली पाहिजे. अज्ञानामुळे आणि खेड्यात कुठल्याच प्रकारची सुविधा नसल्यामुळे शेतकीचा व्यवसाय कंटाळवाणा, अनाकर्षक झाला आहे ही परिस्थिती पालटली पाहिजे. शेतकऱ्यांना शेतीसंबंधीची संपूर्ण माहिती देणाऱ्या संस्था खेड्याखेड्यातून उघडल्या पाहिजेत. शिवाय फावल्या वेळात अधिक पैसा देणारे उद्योगधंदे खेड्यातून सुरू केल्यास शेतकऱ्याचे शहराविषयीचे आकर्षण आपोआपच कमी होईल. एकेकटे शेतकरी हे करू शकणार नाहीत म्हणून त्यांच्यात एकजूट निर्माण केली पाहिजे, सहकारी संस्था स्थापिल्या पाहिजेत. उत्पादन-शक्ती वाढवून आर्थिक पातळी उंचावल्याशिवाय त्यांना स्वतःची उन्नती करून घेणे शक्य होत नाही. याकरिता सहकारी संस्थांची फार जरूरी आहे. त्याकरिता पंचवार्षिक योजनातूनसुद्धा पूर्वी-पेक्षा जास्त लक्ष या गोष्टीकडे पुरविले पाहिजे. खेड्यांची आर्थिक पातळी उंचावल्याशिवाय आणि सामाजिक सुधारणा तिकडे घडवून आणल्याशिवाय हा प्रश्न सुटणे शक्य नाही आणि त्या दृष्टीने वर वर्णन केलेले सर्व दोष नष्ट करून खेड्यांचे पुनरुज्जीवन करणे हा एकच रामबाण उपाय होय. आता वेळच अशी येऊन ठेपली आहे की सुयोग्य आणि लांब मुदतीची योजना आखून ती पार पाडल्याशिवाय दुसरा तरणो-पाय नाही. केवळ अन्नप्रश्न धान्यवाटपाची दुकाने सोडविणार नाहीत, कारण आपण पाहिले आहे की सुयोग्य वाटप ही या प्रश्नाची दुसरी बाजू आहे. पण मागणी इतके उत्पादन ही त्याहून महत्त्वाची बाजू आहे. त्यामुळे मूळ प्रश्न आहे योग्य योजना आखून उत्पादन वाढविणे. कारण तेव्हाच किंमती स्थिर ठेवणे सरकारला शक्य होईल नाहीतर नियंत्रित दुकानात जरी किंमती कमी असल्या तरी काळा-बाजार बोकाळल्याखेरीज राहणार नाही. म्हणूनच ही लांब मुदतीची योजना अत्यावश्यक आहे. सरकारने या दृष्टीने काही योजना आखल्या आहेत :

(१) अनियमित पर्जन्यवृष्टी धान्योत्पादनाला मारक ठरते म्हणून पाणीपुरवठ्यासाठी मोठी धरणे आणि पाटबंधारे या योजनांबरोबरच लहान योजनांवर जास्त लक्ष देऊन अधिक धान्योत्पादन करण्याचे ठरविण्यात आले आहे. (२) चौथ्या पंचवार्षिक योजनेच्या कालखंडात २.३ दशलक्ष टन नायट्रोजनची उत्पत्ती करून खतांसाठी उपयोग करण्याचेही जाहीर करण्यात आले आहे. ३ लक्ष ५० हजार टन खताची आयात करण्यात येणार आहे. १९७०-७१ पर्यंत आयातीचे प्रमाण दुप्पट होणार आहे. (३) शिवाय तांदुळाच्या उत्पादनाच्या बाबतीत नवनवीन प्रकारच्या उत्पादनपद्धतींची मदत घेऊन दर एकरी उत्पादन वाढविण्याचे प्रयोग करण्यात येत आहेत आणि करण्यात येणार आहेत. यासाठी फिलिपाईन्समधील मनिला



अनुक्रमणिका

येथील इंटरनॅशनल राईस रिसर्च इन्स्टिट्यूटची मदत घेण्यात येणार आहे. जे तांदुळाच्या बाबतीत तेच गहू व इतर धान्याच्या बाबतीत– एकूण धान्योत्पादन उपलब्ध जमिनीत जास्तीत जास्त प्रमाणात करणे हेच सर्वोच्च ध्येय मानण्यात आले आहे. (४) सरकारी यंत्रणेतील कुप्रसिद्ध दोष घालविण्यासाठीही बऱ्याच योजना आखण्यात आल्या आहेत– आणि ते अतिशय जरूरीचे पण आहे. कारण धान्य नियंत्रणासाठी जो पैसा खर्च होणार आहे तो हे दोष तसेच राहिल्यास फुकट जाईल नी मग औषधच रोगापेक्षा जास्त हानिकारक ठरायचे.

आपण पाहिलेच आहे की, वाढती लोकसंख्या आणि समप्रमाणात न वाढणारे धान्योत्पादन हे या कूट प्रश्नाचे मूळ कारण आहे. १९२१ ते ५१ या ३० वर्षांत ५० टक्के व्राढ धान्यात व ४४ टक्के लोकसंख्येत झाली. १९५१ ते ६१ या कालखंडात लोकसंख्या २१.५ टक्क्यानी वाढली आहे. नजीकच्या भूतकाळात तरी एकूण परिस्थितीचा आढावा घेता लोकसंख्या तावडतोब कमी होण्याची चिन्हे दिसत नाहीत. त्यामुळे निदान शक्य तितके धान्योत्पादन हरएक उपायांनी वाढविणे हे एकच आपल्या हाती आहे. त्यात कुठल्याही प्रकारे कसूर ठेवून चालणार नाही आणि अन्नधान्याच्या बाबतीत स्वयंपूर्णता मिळविणे हे तर सद्यःपरिस्थितीत फारच महत्त्वाचे, कारण धान्याच्या आयातींपायी होणारा अवाढव्य खर्च युद्धप्रयत्नांसाठी आणि पुढे देशाच्या प्रगतीसाठी तरी वापरात आणता येईल. म्हणजेच येनकेनप्रकारेण निदान १० टक्के तरी उत्पादन वाढविणे नि बड्या व्यापारांच्या साठेबाजीला आळा घालून उपलब्ध धान्याचे योग्य वाटप करणे हे दोन उपाय अन्नप्रश्न बऱ्याच अंशी आटोक्यात आणतील. हे जरी खरे असले तरी यासाठी सरकारला भगीरथ प्रयत्नच करावयास हवेत हे आतापर्यंतच्या अनेक फसलेल्या प्रयत्नावरून दिसून येते.

## समारोप

अन्नप्रश्नाचा हा आतापर्यंत अभेद्य ठरलेला चक्रव्यूह भेदण्यास या अभिमन्यूचा उपयोग नाही, तो त्यातच फसतो. हल्लीच्या सरकारची जवळजवळ हीच अवस्था झाली आहे. त्यासाठी धनुर्धारी अर्जुनच हवा. चक्रव्यूहभेदाचे यथासांग ज्ञान असलेला, नि हरल्यास अग्निकाष्टे भक्षण करण्याची तयारी ठेवणारा; तरच हा प्रश्न सुटेल आणि त्यासाठी चालू सरकारने अर्जुनाचे ज्ञान नि ईर्षा बाळगून वागण्याचे नि जनतेने, जनताजनार्दन होऊन संपूर्ण सहकार्य देण्याचे ठरविले पाहिजे. कारण त्या अर्जुनालाही जनार्दनाचे सहकार्यच तारक ठरेल.

---










श्री. व. भ. कर्णिक

# भारत-पाकिस्तान संबंध-

## ( काही मिथ्या कल्पना व अर्धसत्ये )

भारत आणि पाकिस्तान यांच्यामधील संबंधाविषयी चर्चा करताना नेहमी काही ठराविक मुद्दे पुढे मांडले जातात. त्यापैकी काही मुद्दे मिथ्या कल्पनांवर व अर्धसत्यावर आधारलेले असतात. मूळ प्रश्नाचा नीट विचार व्हावा आणि निष्कारण गैरसमज वाढू नये या दृष्टीने त्या मुद्यांची थोडी चिकित्सा झाली तर बरे होईल.

हरघडी ऐकू येणाऱ्या एका मुद्याचा जरा विचार करू या. तो मुद्दा असा की पाकिस्तान हे ब्रिटिश साम्राज्यशाहीचे अपत्य आहे. ठोकळ मानाने हे विधान खरे आहे. पण जरा खोल विचार केला तर आढळून येईल की ते एक अर्धसत्य आहे.

मुसलमान जमातीला हिंदी राष्ट्रामध्ये समाविष्ट करून घेण्याच्या कार्यात हिंदी राष्ट्रवाद अपेशी ठरला म्हणून पाकिस्तान निर्माण झाले हे विसरून कसे चालेल ? शिवाय अखेरीला पाकिस्तान निर्माण झाले ते कॉंग्रेस व मुस्लिम लिग या दोनही संस्थांच्या पुढाऱ्यांच्या संमतीने हे देखील लक्षात ठेवणे जरूरीचे आहे. कॉंग्रेसने नाकारले असते तर इंग्रजी साम्राज्यशाहीला पाकिस्तान निर्माण करता आले नसते. अर्थात् त्यामुळे भारतीय स्वातंत्र्य लांबणीवर पडले असते ही गोष्ट वेगळी.

स्वातंत्र्य शक्य तितक्या लवकर मिळावे म्हणून भारताच्या राष्ट्रधुरीणांनी पाकिस्तानच्या निर्मितीला संमती दिली. आणि त्यामुळे भारत व पाकिस्तान ही दोन स्वतंत्र व सार्वभौम राष्ट्रे एकाच क्षणी जन्माला आली. ज्या घटनेला आपण जाणूनबूजून, सर्व गोष्टींचा विचार करून, संमती दिली तिलाच आज इंग्रजांची निर्मिती म्हणून हिणवण्यात काय हशील ? इतिहास लिहायला बसलेल्या माणसाने ते विधान केले तर ते समजू शकते, पण भारत-पाकिस्तान संबंधाच्या चर्चेमध्ये ज्या वेळी त वापरले जाते त्यावेळी त्यामध्ये सत्यकथनाऐवजी मनामध्ये घर करून राहिलेला पाकिस्तानबद्दलचा आकस दृष्टीस पडतो असे म्हणता येणार नाही का ?

भारताबद्दलच्या द्वेषाच्या पायावर पाकिस्तानची उभारणी झाल्यामुळे त्याला भारताबद्दल कधीही प्रेम वाटणे शक्य नाही असा दुसरा एक आक्षेप घेण्यात येतो. इथे भारत आणि भारतीय एकराष्ट्रवाद यामध्ये गल्लत करण्यात येते. पाकिस्तानच्या निर्मात्यांचा विरोध होता तो एकराष्ट्रवादाला, भारताला नव्हे. मुसलमान जमातीचे स्वतःचे वेगळे राष्ट्र झाले पाहिजे हा त्यांचा आग्रह होता. आणि त्यामुळे त्यानी कॉंग्रेसला विरोध केला. परंतु पाकिस्तानच्या निर्मितीनंतर भारताला विरोध करीतच राहिले पाहिजे अशी त्यांची भूमिका नव्हती. तसे पाहिले तर सुरवातीला तरी निदान भारत व पाकिस्तान यानी गुण्यागोविंदाने शेजारी म्हणून नांदले पाहिजे अशी दोन्ही राष्ट्रांच्या पुढाऱ्यांची इच्छा होती. ती इच्छा फलद्रूप झाली नाही ही गोष्ट वेगळी. पण पहिल्यापासूनच पाकिस्तानच्या मनात भारताबद्दल द्वेष व दुस्वास होता असे मानायला जागा दिसत नाही.

एकराष्ट्रवाद आणि द्विराष्ट्रवाद ही परस्परविरोधी तत्त्वे आहेत हे खरे. एका राष्ट्रात हे दोन्ही वाद प्रभावी तत्त्वे म्हणून नांदू शकणार नाहीत हेदेखील तितकेच खरे. पण द्विराष्ट्रवादाचा पुरस्कार करून पाकिस्तान मिळवल्यानंतर त्या तत्वाचे आता काय महत्त्व उरले ? त्या तत्वाच्या बळावर भारतातील मुसलमानानी भारताविरुद्ध बंड करायला चिथावणी देणे एवढाच फार तर आता पाकिस्तानला त्या तत्त्वाचा उपयोग. पण या चिथावणीला भारतीय मुसलमान बळी पडतील अशी कल्पना करणे म्हणजे आपल्या एकराष्ट्रीयत्वाच्या सिद्धांतावर अविश्वास व्यक्त करण्यासारखे आहे. द्विराष्ट्रवादाला आज जे महत्त्व आहे ते केवळ ऐतिहासिक स्वरूपाचे, कार्यप्रणाली म्हणून आता त्या वादाला महत्त्व नाही. राष्ट्र म्हणून जन्माला आल्यानंतर राष्ट्र या नात्यानेच पाकिस्तानला इतर राष्ट्रांशी व भारताशी देखील व्यवहार ठेवावा लागतो. आणि भारताने देखील तोच न्याय पाळला पाहिजे. भारत-पाकिस्तानसंबंधांच्या बाबतीत द्विराष्ट्रवादाचा पुरस्कार करून पाकिस्तान जन्माला आले या गोष्टीला आज महत्त्व नाही.

भारतीय मुसलमान द्विराष्ट्रवादाचा पुरस्कार करते तर त्या वादाचा विचार करणे जरूर झाले असते. पण पुरस्कार करण्याऐवजी ते त्या वादाचा धिक्कारच करीत आले आहेत. त्यांच्याऐवजी काही कट्टर हिंदुधर्माभिमानीच त्या वादाचा पुरस्कार करताना दृष्टीस पडतात. आणि उलट पाकिस्तान द्विराष्ट्रवादावर आधारलेले, म्हणून भारताचे त्याच्याशी जमणे शक्य नाही असा युक्तिवादही त्यांच्याच तोंडून ऐकू येतो.



अनुक्रमणिका








पाकिस्तान हे धर्माधिष्ठित ( Theocratic ) राज्य आहे असा एक नेहमीचा प्रवाद आहे. केवळ उथळ दृष्टीने पाहिले तर तो प्रवाद खरा वाटतो. इस्लाम हा पाकिस्तानचा राज्यधर्म ( state religion ) आहे. पण इस्लामला राज्यधर्माचे स्थान देणारी इतरही अनेक राष्ट्रे आहेत. तसेच एखाद्या धर्माला राज्यधर्माचे स्थान देणारी जगामध्ये पुष्कळ राष्ट्रे आहेत. इंग्लंडचाही त्यामध्ये समावेश होतो. इंग्लंडसारख्या राष्ट्राला धर्माधिष्ठित राज्य ( theocratic state ) म्हणता येईल का ? म्हणून धर्माधिष्ठित राज्य म्हणून पाकिस्तानचा धिक्कार करण्यापूर्वी त्या देशात कशा पद्धतीचे राज्य आणि ते कोण चालवते आहे हे जरा काळजीपूर्वक पाहिले पाहिजे. पाकिस्तानमध्ये मुल्लांचे अगर मौलानांचे राज्य नाही हे वेगळे सांगावयास नको. तिथले राज्यकर्ते भारतातल्या राज्यकर्त्याप्रमाणेच पाश्चात्य विद्याविभूषित आहेत. त्यांचा अग्रणी सँढर्स्ट येथे शिकून तयार झालेला, सर्व आधुनिक तंत्रांचे ज्ञान असलेला, आधुनिक पद्धतीने राहणारा व विचार करणारा अद्यावत् सेनानी आहे. पाकिस्तानच्या सामाजिक व आर्थिक कार्यक्रमाकडे नजर टाकली तरीही असे दृष्टीस पडते की त्याची जी खटपट चालली आहे ती आधुनिक, विसाव्या शतकातील प्रगत व प्रबळ राष्ट्र म्हणून पुढे येण्याची. म्हणून नव्याने स्वतंत्र झालेली इतर राष्ट्रे आणि पाकिस्तान यामध्ये फरक करणे फार कठीण आहे.

पाकिस्तानमध्ये मुसलमानेतरांना मुसलमानांच्या बरोबरीची वागणूक मिळत नाही हे खरे. आणि त्या दृष्टीने सुसंस्कृत राष्ट्र या नात्याने भारताचा दर्जा पाकिस्तानच्या मानाने किती तरी श्रेष्ठ आहे. पण हे श्रेष्ठत्व सांगणे आणि त्याचा अभिमान बाळगणे वेगळे आणि पाकिस्तानला धर्माधिष्ठित राज्य मानून त्या कारणासाठी त्याच्याशी संबंध न ठेवणे अगर त्याचा दुस्वास करणे हे वेगळे. धर्माला जरी प्रमुख स्थान देण्यात आलेले असले तरी पाकिस्तानचा कारभार आधुनिक पद्धतीनेच चाललेला आहे आणि आधुनिक राष्ट्र म्हणूनच त्याला जगामध्ये नांदायचे आहे.

पाकिस्तानमध्ये लष्करी हुकूमशाहीचे राज्य आहे हादेखील असाच एक अर्धसत्यावर आधारलेला आक्षेप आहे. भारतातल्यासारखे तिथे संसदीय लोकशाहीचे राज्य नाही हे खरे. तसेच तिथे लोकांच्या स्वातंत्र्यावर व हक्कावर अनेक मर्यादा पडलेल्या आहेत हे देखील तितकेच खरे. तरीही तिथे विरोधी पक्ष आहेत, ते आपली मते प्रसिद्ध करू शकतात आणि त्यांचा प्रचार करू शकतात, तसेच ते निवडणुका लढवू शकतात हे विसरून चालणार नाही. तसेच तिथे स्वतंत्र वर्तमानपत्रे आहेत, स्वतंत्र बाण्याने न्यायदान करणारी न्यायालये व विश्वविद्यालये आदिकरून स्वतंत्र संस्था आहेत हे देखील लक्षात घेतले पाहिजे. म्हणून हुकूमशाही आहे हे खरे; पण पाकिस्तानमधील हुकूमशाही ही साम्यवादी राष्ट्रांमधील हुकूमशाहीसारखी नाही हे ध्यानात घ्यायला हवे. हुकूमशाही हुकूमशाहीमध्ये देखील फरक असतात हे वेगवेगळ्या हुकूमशाही देशांकडे पाहिले की लक्षात येते.

शिवाय परराष्ट्रसंबंधांच्या बाबतीत लोकशाहीवादी राष्ट्रांशीच संबंध ठेवायचा, हुकूमशाहीवादी राष्ट्रांशी ठेवायचा नाही असा काही भारताचा नियम नाही. भारताच्या मित्रराष्ट्रात आजदेखील रशिया, युगोस्लाव्हिया, इजिप्त आदि हुकूमशाही राष्ट्रे आहेत. आणि ते भारताने उद्घोषित केलेल्या पंचशील तत्वानुसारच आहे. दुसऱ्या राष्ट्रांच्या अंतर्गत व्यवस्थेत ढवळाढवळ करायची नाही हे पंचशील मधील एक महत्त्वाचे तत्त्व आहे. आपल्या देशातील राज्यकारभाराची पद्धत ही त्या देशातील लोकांनी ठरवायची असते. त्यामध्ये बाहेरच्या राष्ट्राने अगर लोकानी हस्तक्षेप करू नये. हे तत्व मान्य केल्यानंतर पाकिस्तानला वेगळा न्याय कसा लावता येईल ? पाकिस्तानमध्ये जनतेचे लोकशाहीचे राज्य व्हावे असे वाटणे साहजिक आहे. पण तसे राज्य स्थापन झाल्याखेरीज भारत-पाकिस्तान संबंध सुधारणार नाहीत असे म्हणणे योग्य ठरणार नाही.

भारत आणि पाकिस्तान यांच्यामधील संबंधाबद्दल अनेक दृष्टीने विचार होणे आवश्यक आहे. तसे विचारमंथन आज देशामधे चालू आहे. पण ते विचारमंथन मिथ्या कल्पनांनी आणि अर्धसत्यांनी गढूळ होऊ नये अशी देखील खबरदारी घेतली पाहिजे. खबरदारी घेण्याचा उद्देश एवढाच की मूळ मुद्याचा चवकस बुद्धीने व राष्ट्रहिताच्या दृष्टीने विचार व्हावा आणि निर्णयावर भ्रामक समजुतींची छाप पडू नये.



अनुक्रमणिका








भाई माधवराव बागल

# दोन गांधीवादी

## १. दे. भ. शंकरराव देव

### स्मृती आणि विस्मृती

शंकररावांची कुणाला आठवण होते ? जिवंतपणीच नाही का ते विस्मृतीत गेले ? असे म्हणणारे शेकडो, हजारो, नव्हे लाखो लोक, महाराष्ट्रात तसे भारतात आहेत. अन् शंकररावाना कोण कसे विसरेल, असे म्हणणारे पण महाराष्ट्रात तितकेच आहेत. आणि भारतातले विनोबाजी, जयप्रकाश, कृष्णमूर्ती, पासून सारे लहानमोठे गांधीवादी त्यांना मुळीच विसरले नाहीत. असे विसरले म्हणणारे, आणि न विसरलेले, लोक संख्येने इतके आहेत की ती स्मृती आणि विस्मृती हेवा वाटण्याजोगी व फारच थोड्या पुढाऱ्यांच्या वाट्यास आली असेल.

शंकररावना चांगले वाईट म्हणणारे, वाटेल ती कुत्सित टीका करणारे, जी उच्चारू नये, अशी हीन टीका, पुण्यस्मरण गांधीजींच्यावरही त्यांच्या हयातीत केली, तशीच त्या प्रकारची गलिच्छ टीका शंकररावजींच्यावरही केली गेली आहे.

पण " निर्दोष कोण असेल त्यानेच त्या स्त्रीवर दगड मारावेत " या ख्रिस्त प्रभूच्या आज्ञेची त्यांना आठवण होईल आणि ते आत्मपरीक्षण करू लागतील, तर बेजबाबदारपणे खोटी टीका करून आपण नरककुंडात किती बुडालो आहोत याची त्यांना जाणीव झाल्याखेरीज राहणार नाही.

त्यांच्या पोषाखाची तशीच टीका आणि टिंगल करण्यात येते. पण आतापर्यंत भाविक हिंदुसमाज जनसेवेसाठी, त्यागासाठी, तपश्चर्येसाठी ज्याना भक्तिभावाने पुजतो, देवासमान मानतो, ते बहुतेक सारे संत-महात्मे, दरिद्रीनारायणाचाच पेहेराव घालीत आले आहेत. त्यांचे त्या पेहेरावाचे अनुकरण करणे आणि त्या पोषाखाने दरिद्रीनारायणाच्या जीवनाचे जवळ जाणे, हे टीकास्पद म्हटल्यास चांगल्या गोष्टी या अनुकरण करण्यासाठी नसतात असे म्हणावे लागेल ! शंकररावांची लुंगी आणि उन्हातान्हात आणि कडाक्याच्या थंडीत उघडा असलेला देहाचा भाग म्हणजे गरीबाशी एकरूप होण्याचा प्रयत्न नव्हे काय ? ढोंगच मानले तर आयुष्यभर सर्वच काल खडतर तपश्चर्येचे, जिवाचे हाल करून घेणारे ढोंग कोण किती दिवस करील ? ढोंगाची हीही पण तपश्चर्याच आहे असे मानणे भाग पडेल ! असे सात्विकतेचे ढोंग करता आले तर ते स्वतःला व समाजाला उपकारकच ठरेल !

त्यांच्या अबोल स्वभावाला, मुग्धतेला सात्विकतेचा दर्प, लुंगीची अरिस्टाक्रशी, आणि मोठेपणाची मस्ती, बोलण्यातल्या, वागण्यातल्या, राहणीतल्या अलगपणाला अन् अलिप्ततेला इतराहून श्रेष्ठतेची जाणीव, असाही आरोप करता येईल.

पण तो मौनाचा एक संयमी प्रयोगही असू शकेल. आपल्या संस्कृतीत मौनाला फार महत्त्व आहे. कोणत्याही विषयावर, विचारावर मन केंद्रित करण्यासाठी मौनाची, अन् मितभाषेची आवश्यकता प्रतिपादन केली आहे. मिताहार, मितभाषा वगैरे संयमाने जीवनातील सात्विकता वाढवली जाते. गीतेनेही हा उपदेश केला आहे. मग या आदेशाप्रमाणे शंकररावनी मौन पाळले किंवा कमी बोलायचे ठरवले तर ते त्यांच्या निष्ठेला, निश्चयाला धरून नव्हे असे कसे म्हणता येईल?

### परिचयाची वाटचाल

शंकररावजी जे माझ्या आणि माझ्या वडिलांच्या जवळ आले ते त्यांच्या वैचारिक बैठकीमुळे.

टिळक आणि त्यांचे अनुयायी हे आम्हा बहुजनसमाजाजवळ येऊ शकले नाहीत. आमचे प्रेम, आदर, जिव्हाळा व विश्वास मिळवू शकले नाहीत. त्यांच्या राजकीय ध्येयात आम्हाला त्यांचा वार्गिक स्वार्थ वाटला. त्याना सामाजिक व धार्मिक सुधारणा नको होती. त्याचा उघड पुरस्कार त्यानी कधी केला नाही.








स्त्रीशिक्षणाला व सक्तीच्या प्राथमिक शिक्षणाला त्यांनी विरोध केला! अस्पृश्यता निवारणाची त्यांना आवश्यकता वाटली नाही! सावकार आणि कुळात त्यांनी सावकारांची बाजू घेतली! तेली, तांबोळी, कोष्टी यांनी कौन्सिलात जाऊन काय करायचे असे उद्‌गार काढले!

म्हणून त्यांच्या राजकीय चळवळीला बहुजनसमाज, सत्यशोधक व ब्राह्मणेतर पार्टीचा पाठिंबा मिळाला नाही. खालचे लोक अडाणीच रहावेत व मिळेल ती सत्ता पांढरपेशांच्या हातातच पडावी असा त्यांच्या राजकीय चळवळीचा हेतू आहे असे बहुजनसमाजातील बहुतेक सर्व पुढाऱ्यांना वाटत होते. म्हणून केशवराव जेधे, शंकरराव मोरे, भास्करराव जाधव, कोठारी हे सारे त्यांच्या उलटच होते.

या पार्श्वभूमीवर शंकरराव देवांच्या विचार-आचाराने आम्हा अनेकांचे आकर्षण केले–त्यांचे 'स्वराज्य' हे साप्ताहिक आमच्या 'हंटर' साप्ताहिकाच्या भेटीला येत होते. त्यातील ता. १ माहे डिसेंबर १९२७ च्या अग्रलेखातील शंकरराव देवांच्या विचाराने आम्हाला ते एकदम आपलेसे वाटू लागले. त्या महत्त्वाच्या मजकुरावर माझे वडिलांनी तांबडया शाईच्या रेषा मारल्या होत्या:

"जगातील जी गुलामगिरी नष्ट करण्यासाठी हिंदुस्थान स्वातंत्र्याची इच्छा करीत आहे, ती गुलामगिरी, धार्मिक, सामाजिक, राजकीय, आर्थिक वगैरे अनेक प्रकारची असल्यामुळे.... स्वदेशात धार्मिक सामाजिक अगर आर्थिक गुलामगिरी ज्या निरनिराळ्या रूपाने वावरत असेल, ती रूपे स्वहस्ते नष्ट केली पाहिजेत."

हेच विचार टिळकांनी जाहीरपणे व्यक्त करून, ते आचरण्याचा प्रयत्न केला असता तर महाराष्ट्रात ब्राह्मण-ब्राह्मणेतर वादाला उग्र स्वरूप आलेच नसते.

जेधे, जवळकर, श्रीपतराव शिंदे हे सारे फुले अनुयायी त्यांच्या पाठीशी उभे राहिले असते. याच स्वराज्य पत्रातील लेखात शंकररावजींनी सर्वांगिण क्रांतीचे विचार स्पष्ट मांडले आहेत–

"हिंदुसमाजातील विषमता व अन्याय नष्ट करावयाचे असल्यास हिंदुस्थानात सामाजिक क्रांतीही घडून आली पाहिजे. असे आमचे ठाम मत आहे."

– 'स्वराज्य,' १२ एप्रिल १९२८.

यानंतर शंकररावजी, माझे वडील असताना आमच्या घरी आले होते. वडीलांनाही त्यांच्याबद्दल आपुलकी निर्माण झाली.

केशवराव जेधे हे आम्हाला जवळचे वाटत. ब्राह्मणेतर समाजाचे ते लाडके पुढारी. शंकररावांच्या विचारामुळे त्यांचे आणि शंकररावांचे आता बरेच जमले. गांधीजींच्या समतावादी धोरणामुळे त्यांनी बहुजन समाजाचा विश्वास संपादन केला होता. शंकररावजी त्यांचे कट्टर अनुयायी– यामुळे पूर्वीचा विरोध टाकून केशवराव आणि त्यांचे सहकारी काँग्रेसमध्ये गेले.

आणि पुढे महाराष्ट्र प्रांतिक काँग्रेस कमेटीच्या अध्यक्षपदावर जेव्हा शंकरराव देवांनी स्वत: केशवराव जेध्यांचे नाव सुचवले त्यावेळी माझ्या मनातून त्यांच्या विषयीचा किंतू नष्ट झाला व मी–

'समाजसत्ता की भांडवलशाही' हे माझे पुस्तक– 'महाराष्ट्र प्रांतिक काँग्रेस कमेटीच्या अध्यक्षपदासाठी सत्यशोधक दे. भ. केशवराव जेधे यांचे नाव सुचवून ब्राह्मण-ब्राह्मणेतर प्रेमात भर घातल्याबद्दल– दे. भ. शंकरराव देव यांना अर्पण' केले.

कारण त्यांच्या या समतावादी उदार धोरणामुळे टिळकानुयायातून शंकरराव एकदम निराळे पडले. आणि आम्हाला आपले वाटले.

आणखी जवळ यायला दुसरेही एक कारण झाले होते. ते म्हणजे माझे 'नव्या पिढीचे राजकारण' हे पुस्तक. ते त्यांना व आचार्य शंकररावजी जावडेकर यांना फार आवडले. व दोघांनीही मला तशी पत्रे लिहिली.

शंकरराव देवांनी लिहिले :

"आपण प्रगट केलेले उदात्त, सात्विक व खोल विचार यानी आम्हा सर्वांना आपणाला फार निकट बनवले आहे. हे विचार आचारात उतरविण्यासाठी







काही संघटनात्मक कार्य महाराष्ट्रात व्हावे अशी आमची सर्वांची मनापासूनची इच्छा आहे."

या बोलीप्रमाणे त्यानी मला कोल्हापूर संस्थान प्रजापरिषदेच्या चळवळीत आपले सहकार्य अगदी मनापासून दिले. कोल्हापूर सरहद्दीबाहेर सांगलीच्या भूमीत जी पहिली क्रांतिकारक उठाव देणारी सभा झाली, ती शंकररावजींच्या हजेरीत. त्यानी मार्गदर्शन केले. नंतर अनेक वेळा त्यांचे व तात्यासाहेब शिखरे यांचे संबंध येत गेले ते विलिनीकरणापर्यंत.

मला ज्यावेळी शिक्षा झाली त्यावेळी शंकररावजीनी माझ्याबद्दल लोकशक्तीत अग्रलेख लिहून माझे अभिनंदन केले. "अखेर कोल्हापूर दरबारने जनतेचे आवडते पुढारी श्री. बागल यांना १२४ अ या राजद्रोहाच्या कलमाखाली २ वर्षे सक्त मजूरी व एक हजार रुपये दंड अशी कडक शिक्षा दिली ! कोल्हापूर दरबारने श्री. बागल यांच्या दीर्घकालीन जनसेवेवर या शिक्षेने जे दरबारी मान्यतेचे शिक्कामोर्तब केले त्याबद्दल श्री. बागल यांचे स्नेही व कोल्हापूर संस्थानातील कार्यकर्ते व जनता यांना एक प्रकारे समाधान वाटून ते सर्व श्री. बागल यांचे हार्दिक अभिनंदन करतील अशी मला खात्री आहे –"

तुरुंगातून सुटून आल्यानंतर मंत्रिपद स्थापन होईपर्यंत शंकररावांचे व माझे चांगले संबंध होते. काही कटु प्रसंगही आले. तेही अतिरेकापर्यंत गेले.

दक्षिणी संस्थानचे संघराज्य व्हावे हीही शंकररावजींची खटपट होती. यावेळी मी सर्व दक्षिणी संस्थान प्रजापरिषदेचा अध्यक्ष होतो. या संघराज्याचा विचार करण्याकरता ८-१०-४६ ला दक्षिणी संस्थानच्या सर्व राजेलोकांची व प्रजापरिषदांच्या अध्यक्षांची बैठक झाली. शंकरराव मार्गदर्शनाकरता हजर होते. पण या कल्पनेला मूर्तस्वरूप येण्याअगोदरच जमखिंडीकर व फलटणकर यानी विलिनीकरणाला अनुमती दिली अन् वल्लभभाईंची पण तीच इच्छा होती.

## अलीकडील यशापयश

पण यानंतर का कोण जाणे पण महाराष्ट्र काँग्रेसमध्ये दुफळी पडली. पुनः दोन्ही बाजूचा दडलेला जातिवाद डोकावला की काय कोण जाणे ! एकमेकावर तशी टीका झालेली मीच ऐकत होतो. मीही तसाच नाराज झालो होतो.

महाराष्ट्र काँग्रेस, ज्यानी शंकररावांना साहाय्य देऊन बळकट केली ते केशवराव जेधे, मोरे, खाडिलकर वगैरे पुढारी बाहेर पडले. फार मोठी शक्ती बाहेर पडली. आणि त्यानी शेतकरी-कामगारपक्षाची स्थापना केली. त्यावेळी तो पक्ष काँग्रेसच्या तोडीचाच नव्हे तर काँग्रेसला हादरा देणारा होता– मीही शेतकरी पक्षात जाऊन मिळालो– शंकरराव देवांचे संबंध दुरावले–

बहुजन समाजातले बहुतेक नामवंत पुढारी बाहेर पडल्यामुळे काँग्रेस डळमळू लागली. ती सावरून धरायला भाऊसाहेब हिरे यांना महत्प्रयास पडले. काँग्रेसला बहुजनसमाजात नेण्याची महान् कामगिरी केशवराव जेध्यांनी केली तशीच ती सावरण्याची विकट कामगिरी भाऊसाहेब हिरे यानी केली. ती जबाबदारी स्वीकारण्यासाठी शंकरराव देवांनी भाऊसाहेबांना आग्रह केला.

यानंतर संयुक्त महाराष्ट्राच्या प्रश्नात शंकररावनी पुढाकार घेतला. प्राण पणाला लावून लढणार अशी भावना लोकात जागृत केली. दुरावलेले सर्व, सारा दुजाभाव टाकून पुनः एकत्र झाले. महाराष्ट्रातल्या सर्व पक्षांनी शंकररावांचे पुढारीपण मान्य केले. मीही मरणाच्या जिद्दीने त्यात भाग घेतला. माझ्या संधिवात आजाराची पर्वा केली नाही.

प्रभातकार कोठाऱ्यांनी त्याबद्दल माझा पत्रातून गौरव केला. ते म्हणतात –

> 'महाराष्ट्राविषयीचा एवढा प्रखर, जाज्वल्य व स्वार्थनिरपेक्ष अभिमान माधवरावजींच्या इतका इतरत्र कोठेही आम्ही पाहिला नाही. प्रकृतीची व प्राणाची पर्वा न करता रात्रंदिवस कष्ट केले.'

शंकरराव या प्रश्नावर उपोषण करणार असे मी ऐकताच मीही त्यांचेबरोबर प्राणांतिक उपोषण करण्याचे जाहीर केले. तेव्हा मला जव्हारहून शिवराम-भाऊ तेंडुलकर यांचे व इतरांची पत्रे आली. श्री. शंकररावजी देव एकटेच प्राण पणाला लावणार नसून त्यांची परंपरा चालवण्यास आम्ही तयार

आहोत असा आपला आवाज आपल्या अभिनव शौर्याची साक्ष देत आहे' (तेंडुलकर).

मीच काय महाराष्ट्रातले अनेक, शंकररावजींच्या साठी मरायला तयार झाले असते. शंकररावजींनी यावेळी लोकप्रियतेचे शिखर गाठले होते. पण आपल्या जिद्दीने, कर्तृत्वाने, निश्चयाने चढलेल्या त्या शिखरा-वरून त्यांनी त्या प्रश्नाला भलतीच कलाटणी देऊन स्वतःला एकदम अप्रियतेच्या खोल दरीत ढकलून दिले. हा संयुक्त महाराष्ट्राचा प्रश्न हाती घेतल्यामुळे वल्लभभाई दुखवले. वल्लभभाई दुखवल्यामुळे काँग्रेसच्या अध्यक्षपदाला त्यांचा विरोध झाला. व लोकांना अप्रिय होईल अशी भूमिका अखेर घेतल्यामुळे लोकमानसातूनही खाली उतरले.

ह्यातून त्यांना पुनः वर चढता आले नाही! त्या-नंतर अहिंसावादाच्या प्रयोगाने चीन–भारताचा समझोता घडवून आणण्याचा अचाट, अव्यवहारी प्रयोग करून टीकेच्या प्रचंड माऱ्यात शंकरराव जर्जर झाले. पण त्यांची जिद्द मोठी, निश्चय मोठा, यात शंका नाही.

### मानसिक परिणाम

पण या अपयशाने त्यांच्या मनावर भयंकर परिणाम झाला असावा. नैराश्य व विफलता सहन करण्याच्या मर्यादेपलीकडे परिस्थिती गेली. आणि मग त्यांनी जाणूनबुजून तोंड उघडायचे नाही असे ठरविले, की त्यांची वाचा त्या आघाताने बंद पडली, हे आम्हाला सांगता येणार नाही. कारण ते आता पूर्व स्थितीवर आले आहेत. म्हणून असेही वाटते की न बोलण्याचा आश्चर्यकारक अनाकलनीय संयम त्यांनी राखला नसेल कशावरून? याचे बरोबर उत्तर तेच देऊ शकतील. त्यांचे मित्र मात्र भयंकर बुचकळ्यात पडले होते.

### आदरणीय कुटुंबीय

शंकररावांनी संन्याशाप्रमाणे जीवन काढले. जाणून बुजून गरीबीचे जीवन पतकरून महात्माजींची परंपरा राखली. शंकरराव जबर महत्त्वाकांक्षी. त्यांना कार्याचा उन्माद चढे. अन् सर्वस्वाचा विसर पडे. पण त्यांच्या बऱ्याच महत्त्वाकांक्षा सफल झाल्या नाहीत.

काँग्रेस अध्यक्ष होईपर्यंत मजल गाठली. आणि ती पदरात पडली नाही.

संयुक्त महाराष्ट्र प्रश्नातही विफलता आणि अप्रियता पदरात पडली. चीनच्या हाती घेतलेल्या प्रश्नाने तर विफलतेची कमाल मर्यादा गाठली.

तथापि शंकररावांचे थोर कार्य, सेवा, महाराष्ट्र काँग्रेसवर झालेले उपकार विसरतो म्हटले तरी विसरण्याजोगे नाहीत.

टिळकांच्या वैचारिक पकडीतून महाराष्ट्रातल्या आणि मुख्यतः पुण्यातल्या पांढरपेशा मध्यमवर्गीयांना काँग्रेसमध्ये आणले ते शंकरराव देवांनी–अशा रीतीने महाराष्ट्रात काँग्रेसची प्राणप्रतिष्ठा केली ती शंकरराव देव व जेधे या द्वयांनी. आणि त्याची जाणीव हल्लीचे म. प्र. काँ. चे अध्यक्ष विनायकराव पाटील यांनी जाहीरपणे प्रकट केली आहे.

शंकररावाचे माझे संबंध १९२७ पासून ते या कालपर्यंत चालत आले आहेत. पण ते जिव्हाळ्याचे किंवा मैत्रीचे आहेत असे मला म्हणता येणार नाही. त्यांच्या स्वभावातील मुग्धता व अलिप्तता यामुळे जवळ असूनही ते दूरच राहिले. कोरगावकर ट्रस्टचे ते अध्यक्ष. मी ट्रस्टी असल्यामुळे मात्र त्यांच्या माझ्या यावेळेपर्यंत गाठीभेटी पडत आल्या. तेथेही त्यांचे माझे मतभेद झाले आहेत. एकमेकाबद्दल जातिवादाच्या शंका डोकावल्या आहेत. तरी त्यांचा मोठेपणाही मी जाणू शकलो. मतभेदांमुळे किंवा कटुप्रसंगामुळे ती जाणीव मी केव्हाही टाकू शकलो नाही. कसलेही कटुप्रसंग आले तरी आम्ही एकत्र कुटुंबियापैकीच आहोत ही भावना कोरगावकर ट्रस्टमुळे राहू शकली.

---

## २. अप्पासाहेब पटवर्धन

काय लिहावे यांच्याबद्दल?

त्यांच्या माझ्यात साम्य असे कुठेच नाही! मी प्रयत्न केला तरी आढळत नाही. पण लिहावे असे वाटतय एवढे खरे. मी चित्रकार हेच त्याचे कारण असावे. तसे म्हटले तर आज तरी मला चित्रकार असे म्हणता येणार नाही. कागद, कुंचला, रंगाची पेटी उघडून किती तरी वर्षे झाली मला. पण चित्रकाराची वृत्ती जिवंत आहे ना माझ्यात!



अनुक्रमणिका






## दोन गांधीवादी

चित्रकाराला सर्वसाधारण माणसाचे चित्र काढायला आवडत नाही. काढायला घेतले तर हुरूप येत नाही. त्याला वैचित्र्याचे आकर्षण वाटते.

याचमुळे मला अप्पासाहेबांचे चित्र काढावे असे वाटू लागले. तसे म्हटले तर माणसाचा चेहरा चांगला वठण्यासाठी बहिरंगाचे बारिक सारिक निरीक्षण करावे लागतेच. पण बाहेरच्या कातडीच्या आत शिरकाव करून अंतरंगातही बुडी मारावी लागते. आत्म्याचा शोध घ्यावा लागतो. त्याचा पोषाख, त्याचा स्वभाव, त्याचे जीवन, त्याची राहणी, त्याची संस्कृती, त्याचे ध्येय, ध्येयाविषयीची त्याची चिकाटी, हे सारे समजले म्हणजेच त्या चित्रात जिवंतपणा येतो.

बहिरंगाचे चित्रण ओळख पटवू शकेल, पण ती कातड्याची. माणसाची नव्हे. तशी जवळीक असल्याशिवाय माणसाची खरी ओळख चितारता येत नाही. बाहेरचा पडदा दूर केल्याशिवाय खरा माणूस दिसत नाही.

त्या पडद्याआडच्या अप्पासाहेबांचा, माझ्या मनावर काही तरी परिणाम झाला असावा. म्हणूनच माझी लेखणी फुरफुरू लागली असावी. पुढे धाव मारण्यासाठी घोडा फुरफुरतो आणि खुराने माती उधळतो ना तसे.

त्यांचा तो अवतार !!

त्याला सुसंस्कृत माणूस कोण म्हणेल ! गिरिकंदरातील प्रथमावस्थेतला माणूस गुहेतून बाहेर पडावा ना, तसा त्यांचा अवतार ! वल्कले परिधान करण्याऐवजी अंगावर वस्त्र गुंडाळून हिंडत असावेत एवढेच ! त्या कपड्याला परटाचा हात किंवा इस्त्री जन्मात कधी शिवली असेल असे कोणाच्या स्वप्नातही येणे शक्य नाही. आगगाडी, मोटार, विमान, अॅटमबाँब, सिल्क, वूल, रेयाॅन, टेरेलिनच्या या फॅशनच्या युगात, त्रेतायुगातील ही व्यक्ती, कोठून कशी आली याचाच अचंबा वाटणार पाहणाऱ्याला !

वस्तऱ्याचा संपर्क नसलेली ती दाढी. साबणाऐवजी शाडूची माती लावून धुतलेले ते कपडे ! साबणाला शिवायचे नाही अशी शपथ घेतल्याशिवाय असा तजेला चढणार कसा त्या कापडाला ! कपड्यावर शिंप्याचे संस्काराऐवजी अप्पासाहेबांचे हात प्रयोगच खास झाले असावेत, अशीच कोणालाही शंका येणार. धोतर गुडघ्याचे खाली कधी येणार नाही ! हात कधी झाकले जाणार नाहीत ! युद्धजन्य परिस्थितीत कोणजाणे वस्त्राची काटकसर असेलही. पण आधुनिक जगाचा संस्कार दाखवणारी फाटकी चिंधुटलीही कोठे लोंबत नव्हती ! यानी सोमवारचे एक वेळचे जेवण सोडले नाही तर त्याला कायमचाच फाटा दिला असावा, असे त्यांचा अवतार दर्शवीत होता. अन् चौकशी करता समजले की खरेच ते बरीच वर्षे एकवेळचे जेवण घेत असतात. जेवण म्हणजे काय ? कोणालाही आपल्यासाठी त्रास द्यायला नको म्हणून कोरडे पोहे, शेंगदाणे व गूळ गठ्ठळ्यात बांधून घेणार ! कुठेही पडता यावे म्हणून एक घोंगडे, त्या बोचक्यात असायचे. प्रवासी जीवनाला बोजा कमी करता येईल तेवढा करावा म्हणून त्यानी आपली हाडे झाकण्यापुरता कातडीचा बोजा राखला असेल तेवढाच ! पाश्चात्य संस्कृतीमुळे गुदमरलेल्या छातीतून निघालेला तो नाकातला आवाज !

अप्पासाहेब म्हणजे आधुनिक जगातील एक वैचित्र्यपूर्ण नमुना !!

असा हा अवतारी पुरुष एम्. ए. पास आहे. आणि फर्स्टक्लासमध्ये पास झालो आहे म्हणे. कोणाला तरी खरं वाटणं शक्य आहे ? पण वस्तुस्थिती आहे खरी तशी.

बाळपणी ते शिवाजी, टिळक, सावरकर यांचे चाहते. त्यांचेकडून प्रेरणा घेतलेले. पण गांधीजींच्या सहवासात काही दिवस काढल्यामुळे, त्यांचे परिवर्तन होऊन ते कट्टर गांधीवादी बनले.

१९३० साली सरकारने गांधीजींना राजकीय कैदी म्हणून येरवडा जेलमध्ये ठेवले होते. त्यांना तेथे एकटे वाटू नये म्हणून त्यांच्याजवळ राहण्यासाठी जेलमध्ये अप्पासाहेबांना ठेवण्यात आले. आणि गांधीजींच्या बरोबर सर्व वेळ घालवण्याची अपूर्व संधी अप्पासाहेबांना मिळाली. अनेक विषयावर प्रश्न विचारून समजून घेता आले. यामुळे ते पक्के गांधीवादी बनले.

राजकारणात त्यांना कधीच राम वाटला नाही. त्यानी स्वतःला सत्तेचा संपर्क कधी लावू दिला नाही. त्यांचा पिंड विधायक कार्याचा.








ते मूळचे प्रोफेसर. तरी संधी येऊनही त्या पेशात शिरले नाहीत. वस्तुतः लेखन हा त्यांच्या आवडीचा विषय नव्हे. साहित्यिक होण्याचा त्यांनी कधीही प्रयत्न केला नाही. विधायक कार्य हे त्यांच्या जीवनाचे उद्दिष्ट. जे काही वाङ्मय निर्माण झाले ते ह्यातून, त्या अनुभवातून. ते अनुभव व ते विचार सेवेकरता, सेवाभावाने, लोकांसमोर मांडले.

'सेवाधर्म' हे त्यांचे पहिले पुस्तक. त्यानंतर 'सत्याग्रह व स्वराज्य'. एम्. ए. तत्त्वज्ञान विषय घेऊन झालेले. या विषयात मिळवलेले विशेष नैपुण्य, अध्यापकाची मनोवृत्ती, चर्चा करणाऱ्या पंडितांची तुरुंगात संगती व अनुभव, यातून त्यांची ग्रंथनिर्मिती झाली आहे. त्यांचे बरेच लिखाण १९४२ मध्ये बेळगावच्या तुरुंगात झाले.

गांधीजींनी अप्पांचे लेख 'यंग इंडियामध्ये' आग्रहाने घेतले आहेत. ही एकच गोष्ट त्यांची योग्यता सिद्ध करण्यास पुरी आहे.

गांधीजींच्या मृत्यूनंतर विनोबाजींच्या पाऊलावर पाऊल टाकून भूदान-ग्रामदानाचा ते अखंड प्रचार करीत सुटले. 'गावचे गोकुळ' 'भूमिक्रांतीची आघाडी', 'व्याजबट्ट्याचा निरोध', 'शोषणमुक्तीची आघाडी' वगैरे पुस्तके त्यांनी प्रसिद्ध केली. अलिकडे त्यांना वेड लागले आहे ते 'अर्थ शुद्धीचे'.

'जुलूम जबरदस्तीखेरीज लोकशिक्षण व समाज प्रबोधनाच्या निर्दोष निरुपद्रवी मार्गाने आर्थिक शुचिता व सामाजिक न्याय घडवून आणण्याचा अर्थशुद्धीइतका सोज्वळ व बिनतोड उपाय मला अन्य सुचत नाही' असे अप्पासाहेब म्हणतात.

'पैशामुळे माणसाची संग्रहशक्ती अमर्याद वाढली. लोभ अनावर झाला! भाडे, डिव्हिडंड, नफा या-सारखे शोषणाचे प्रकार निघाले! परिणामी समाजात द्वेष, मत्सर व संघर्ष फैलावले!

म्हणून अप्पांनी मुद्राक्षयाचा कार्यक्रम हल्ली आपल्या जीवनाचे एक आद्यकर्तव्य म्हणून हाती घेतला आहे.

कोणी भेटेल त्याला ते आपले विचार जीव तोडून सांगत असतात. हा प्रयोग त्यांनी माझ्यावरही केला. मला स्वतःला यातले बरोबर काही समजले नाही. टाळक्यात शिरले नाही. पण इतक्या कळकळीने सांगणाऱ्या माणसाला नाराज आणि निरुत्साही कर-ण्याची छाती मला काही झाली नाही. म्हणून काही समजले नसतानाही मी उगाच मान डोलावत होतो.

रत्नागिरी जिल्ह्यातील जनता यांचे त्यागी सेवारत जीवनामुळे, यांच्याकडे भक्तिभावाने पाहते. जी माझी स्थिती तीच खेडुतांची झाली असावी. अप्पासाहेबांना वाईट वाटू नये म्हणून ते माझ्याच-प्रमाणे माना डोलावत असणार. व हात वर करीत असणार. अप्पाही समाधानाने, आपले काम झाले असे समजून दुसरे गाव जिंकण्यास जात असणार. पण मागचे गाव बहुधा सपाटच झालेले असणार! पण हे सांगण्याची छाती अप्पासाहेबांच्या सात्विक आणि कष्टाळू जीवनामुळे कोणा खेडुताला होईल हे शक्य नाही. तो त्यांच्या तपश्चर्येचा प्रभाव.

अप्पासाहेबांचे विक्षिप्त व अव्यवहारी वाटणारे हे विचार जगातल्या थोर माणसांनी मांडले आहेत. जॉन रस्किनच्या 'अन् टु दि लास्ट' या प्रसिद्ध ग्रंथात वाचल्यासारखे वाटते.

नाणी येण्याअगोदर पैशाऐवजी, पूर्वी वस्तूंची अदलाबदल पद्धती समाजात अस्तित्वात होती. नाणी हा उपयुक्त शोध लागल्यानंतर ती मालाच्या अदला-बदलीची बोजड व्यवस्था मोडून गेली. त्यानंतर समाजवादी विचारवंतांनी ती पुढे आणली. रशियाने श्रमाची कार्डे काढून माल देण्याचा प्रयोग करून पाहिला आहे. यामुळे संचयाची वृत्ती कमी होऊन श्रमाला महत्त्व प्राप्त होईल. अन् पैशाची गरजच भासणार नाही, ही या मागील भूमिका होती.

धनसंग्रह करता येतो. वाढवता येतो. तसा धान्याचा, कपड्याचा वगैरे प्रकारच्या मालाचा साठा करता येत नाही. केला तर तो लवकर नाश होतो. पिढ्यान्पिढ्या टिकत नाही.

जग आता एकच झाल्यामुळे सर्वच जगाने या पद्धतीचा स्वीकार केल्याखेरीज एकाच राष्ट्रातला प्रयोग यशस्वी होणे फार कठीण आहे. पण अप्पांच्या निष्ठेला कोण दोष देईल?

अप्पांनी 'अर्थशुद्धीच्या' कार्यक्रमाबरोबरच 'भंगीमुक्तीचा' कार्यक्रम हाती घेतला आहे. स्वतः हाती खराटा घेऊन आचरणात आणला आहे.









अनुक्रमणिका

भंग्याचे काम वरच्या वर्गाने स्वतः करून त्या कामाचा आणि त्या जातीचा कमीपणा काढून टाकावा, हा त्यांचा प्रयत्न आहे. त्यासाठी 'फाऊंटनपेनप्रमाणे' खराटाही त्यांचेबरोबर असतो. कणकवली गावी हे भंग्याचे काम ते स्वतः करीत होते. गोपुरी संडास व सोपा संडास हा त्यांचा ग्रामीण जीवनाला उपयुक्त असा शोध आहे.

घातपाती चळवळीबद्दल त्यावेळी मी प्रकट केलेले व अप्पांचे विचार यात साम्य होते. म्हणून मला फार समाधान वाटले. ते लिहितात :

'ऑगस्ट १९४२ च्या प्रचंड उठावणीला सुरुवातीपासून जे काही अंशी गुप्ततेचे व कपटाचे वळण मिळाले व त्यापायी त्या तेजस्वी चळवळीची सुद्धा जी तेवढ्या प्रमाणात कुचंबणा झाली, ती पाहून माझ्या मनाला फार क्लेश झाले.'

गांधीजीही याच विचाराचे होते. या भूमिगत चळवळीमुळे त्या त्या व्यक्तीत ती चोरटी विश्वास-घातकी वृत्ती मुरली व पुढील जीवनात ती डोकावली !

हिंदु-मुसलमान ऐक्याबद्दलचे अप्पासाहेबांचे विचार अमलात आले नसले तरी चुकीचे आणि अव्यवहारी मुळीच म्हणता येणार नाहीत. गांधीजींनी तेच मांडले होते. अप्पासाहेब लिहितात !

"हिंदु-मुसलमानांनी परस्परांविषयी निर्बल बनले पाहिजे. निर्बल हे तंतोतंत तुल्यबल असतात. परस्परांविषयी निर्बल बनणे हाच एकत्र नांदण्याचा सोनेरी नियम आहे. पति-पत्नी, पिता-पुत्र हे परस्पराविषयी निर्बल असतात तोपर्यंतच ते एकत्र नांदू शकतात. निर्बल बनणे म्हणजे नेभळे बनणे नव्हे. सोशीक, जागरूक योजक बनणे. प्रेम आपुलकी व न्याय यांची कास धरणे."

किती मोलाचे व खरे व्यवहारी उपाय आहेत हे. निशस्त्रीकरणासाठी आज जगात जी निकड भासू लागली त्या मागील विचारसरणी हीच आहे.

"संपूर्ण निःशस्त्रीकरणाच्या दृष्टीने अण्वस्त्रांचे सर्व चाचणीप्रयोग बंद करावेत असा भारतासह ३० हून अधिक तटस्थ राष्ट्रांनी मांडलेला ठराव युनोने नुकताच पास केला आहे'.

दुर्बल बनण्याचाच हा उपाय होय.

अप्पासाहेबांचा व माझा संबंध फार वर्षापूर्वी आला होता. त्यावेळी अप्पासाहेबांची योग्यता मला माहीत नव्हती. खेर मंत्रिमंडळ स्थापन होण्यापूर्वीची ती वेळ असावी. महाराष्ट्र प्रांतिक काँग्रेस कमेटीने माझा दौरा बऱ्याच जिल्ह्यात आखला होता. माझा दौरा यशस्वी करण्याचे व माझी व्यवस्था नीट ठेवण्याचे काम अप्पासाहेबांनी रत्नागिरी जिल्ह्यातील त्या भागापुरते स्वीकारले असावे. माझी खाण्या-पिण्याची, राहण्याची, फिरण्याची व्यवस्था ते व करमळकर पहात होते. स्वतः शेंगदाणे व भाकरीचे तुकडे खात व मला मांसाहारी थाटाची मेजवानी देत. माझ्याजवळ पंक्तीला शेजारी बसून, त्याना निषिद्ध असलेल्या अन्नाचा मला आग्रह करीत. अप्पासाहेबांच्या थोरवीची मला कल्पना नव्हती. इतर तालुक्यात माझी व्यवस्था ठेवणारे लोक असत, त्याप्रमाणे, भिक्षुकाप्रमाणे दिसणाऱ्या या ब्राह्मणाचे मला आश्चर्य वाटले.

सावंतवाडी प्रजापरिषदेचा मी अध्यक्ष होतो. मोठ्या थाटाचे अधिवेशन होते. मंडप सावंतवाडीच्या कलाकुसरीच्या वृत्तीला शोभेसा होता. आमची स्वारी अचकन् कोट वगैरे राजशाही थाटात व्यास-पीठावर विराजमान् झाली होती. हे गृहस्थ (अप्पासाहेब) अंग चोरून कुठेतरी बसले होते. मी अप्पांच्याहून किती लहान. विद्वत्तेने, सेवेने, (वयाने नव्हे) याची कल्पना असती तर व्यासपीठाजवळ शेजारी घेतले असते. पण स्वतःच्या मोठेपणाच्या घमेंडीत बसलेलो ! अप्पांच्यासारख्या यःकश्चित दिसणाऱ्या माणसाकडे आम्हा श्रेष्ठांचे लक्ष कसे जाणार ?

अप्पांची विद्वत्ता, पात्रता, पावित्र्य, सेवा, केवढी मोठी ! मानमरातब पैसा अन् कोणतीही अधिकाराची जागा मिळवता येण्याजोगी पात्रता असताना आपल्या ध्येयाचा प्रचार करण्याकरता, अहोरात्र रानावनात वेड्यापिशासारखा वणवण हिंडत असलेला हा ऋषी पाहून, या थोर महात्म्याचे पाय धरावेत असे मला वाटते. त्यांची ध्येयनिष्ठा बलवत्तर ! जिद्द केवढी दांडगी ! कष्टाला सीमा नाही. आपल्याच कार्यक्रमाने देशाचा उद्धार होणार असे समजून बुद्ध-भिक्षूच्या निष्ठेने, पायाचे चक्र सतत चालू ठेवणार.








मोठे मोठे त्यागशून्य मंत्री पाहिले म्हणजे आदर नसताना नमस्कारवजा कपाळावर हात मारून घ्यावा लागतो. पण अप्पासाहेबांचे स्वखुषीने स्वीकारलेले दरिद्री जीवन पाहून विनम्रभावे मस्तक पायावर ठेवावेसे वाटते.

अप्पासाहेबांनी खादी सोडलेली नाही. तो आपला एक पवित्रधर्म म्हणून ते वापरत आहेत. स्वतःच्या सुताचे कापड वापरत आहेत. देवपूजेप्रमाणे रोज सूत कातत आहेत. त्यांच्या हातून वेळेचा अपव्यय कधी झालेला नाही. रात्रंदिन सेवेचा ध्यास. त्यांनी लग्न ध्येयाशीच लावून घेतले आहे.

जगाच्या मोठेपणात अशा वेड्या पीरानीच भर घातली आहे. ख्रिस्त, बुद्ध, गांधी हे वेडे नव्हते तर कोण ?

अप्पासाहेब म्हणजे गांधीजींच्या मालेतील एक मौल्यवान मणी होत. त्याग, सेवा हीच त्यांची संपत्ती. त्यांच्यापुढे कुबेर हाच दरिद्री होय.

---

## वाचकांचा पत्रव्यवहार :-

### भारत आणि रशिया, अमेरिका

चीनचे संरक्षणमंत्री श्री. लीन पो यांनी अलिकडच्या एका प्रबंधात "अमेरिका व रशिया या देशाविरुद्ध दंड थोपटण्यासाठी चीन देशाने कटिबद्ध व्हावे" असे आवाहन प्रतिपादिले आहे. मात्र लीन पो यांच्या पोटात खरी मळमळ अशी आहे की, "रशिया व अमेरिका या देशात संघर्ष निर्माण व्हावा."

शांततेमधून जगात स्थैर्य निर्माण व्हावे असे रशिया व अमेरिकेस मनोमन पटत चालले आहे. म्हणूनच रशिया आणि अमेरिका १० वर्षांपूर्वीपेक्षा जवळ येत चाललेले आपण पहातो. मात्र चीनची असूया सबंध जग पादाक्रांत करण्याची आणि युद्ध व असंतोष यातून जगात शांततेचे नाटक निर्माण करण्याची आहे. याचा अर्थ राक्षसीवृत्तीने शांतता आणि सहजीवन याचा जगातून नायनाट करण्याचा चीनने विडा उचललेला आहे.

या शांतताप्रिय भारताला चीन पाण्यात पहाण्याचे अगित दुसरे-तिसरे काही नसून "आशियात लोकशाहीचा आणि मानवतेचा नंदादीप तेवत ठेवण्याची राष्ट्राध्यक्ष डॉ. राधाकृष्णन् व पंतप्रधान शास्त्रीजी या भारतीय नेत्यांची आणि कोट्यवधी जनतेची जी जाज्वल्य इच्छा आहे, तीच चीनच्या अंतःकरणात सलत आहे," ही होय. म्हणजे चीनला भारत, अमेरिका व रशिया या जगातील प्रभावशाली राष्ट्रांची कंबर मोडावयाची आहे.

रशिया व भारताचे आज सलोख्याचे संबंध आहेत. मुख्य आवश्यकता अमेरिका व भारत यांचे संबंध रशिया व भारतासारखे असणे ही आहे. असे घडल्यास भारत, रशिया व अमेरिका ही एका विचाराची राष्ट्रे होतील. हे काम काही कठीण असले तरी अत्यावश्यक आहे. ह्या तीन राष्ट्रांची लोकशाही व मानवतेच्या अधिष्ठानावरील एक प्रभावी विचारसरणी तयार झाल्यास जगाला शांततेचे दिवस खरोखरच जवळचे दिसू लागतील.

भारतातील खासदारांची शिष्टमंडळे जगातील देशात जात आहेत. उपरिनिर्दिष्ट महत् कार्यासाठी ही शिष्टमंडळे रशिया व अमेरिकेत गेली आणि डॉ. राधाकृष्णन् व श्री. शास्त्रीजी यांनी या कामी खास लक्ष घातले तर भारत आणि रशिया, अमेरिका एकत्र येण्यास निश्चितच योग्य वातावरण निर्माण होईल. या घटनेचे जगात फार मोठ्या प्रमाणात स्वागत होईल असे म्हटल्यास कसलीच अतिशयोक्ती होणार नाही.

आळेफाटा, (जि० पुणे) --विश्वास चौगुले








( २ )

## समाजवादाचा फेरविचार

महत्त्वाच्या पारिभाषिक शब्दांची अर्थनिश्चिती न करताच भोंगळपणाने त्यांचा वारेमाप उपयोग (अथवा दुरुपयोग) करून स्वतःची वा समाजाची दिशाभूल करण्याच्या प्रयत्नांपासून समाजाचे रक्षण करण्यासाठी विचारवंतांनी बद्धपरिकर होण्याची गरज स्वतंत्र भारतात फार तीव्रतेने भासत आहे हे लक्षात घेऊन अशा तऱ्हेचा एक प्रयत्न म्हणून मी डॉ. पटवर्धनांच्या लेखाचे स्वागत केले होते. नोव्हेंबर १९६५ च्या नवभारताच्या अंकातील प्रा. जयंत राईलकरांचा लेखही याच दृष्टीने स्वागतार्ह आहे. या दोन विद्वानांनी माझ्या विचारांसंबंधी जे काही लिहिले आहे त्यातील एक दोन मुद्यांच्या स्पष्टीकरणार्थ हे लिहित आहे.

पिळवणुकीतूनच समाजात संपत्ती उत्पन्न होते वगैरे विवेचनात पिळवणूक या शब्दाच्या अर्थासंबंधी डॉ. पटवर्धन यांचा गोंधळ झालेला दिसतो या माझ्या विधानाला आक्षेप घेताना डॉ. पटवर्धन म्हणतात की पिळवणूक शब्दाचा अर्थ मलाच समजलेला नाही. वस्तुस्थिती अशी आहे की डॉ. पटवर्धनांच्या लेखात अभिप्रेत असलेला अर्थ माझ्या खरोखरीच लक्षात आलेला नाही व समाजवादी विचारसरणी धारण करणाऱ्या विचारवंतांच्या लक्षात तो आला असेल की नाही याचीही मला शंका आहे. श्रमिकाला मिळावयाच्या योग्य मोबदल्यापासून त्याला अमुक अंशाने वंचित करणे म्हणजे पिळवणूक असाच अर्थ त्यांच्या लेखातून निघतो असे मला वाटते व अद्यापही वाटते. हा अर्थ घेतल्यास शासकीय कर म्हणजेही एका अर्थाने पिळवणूकच होय असे मी म्हटले होते. परंतु पिळवणूक शब्दाचा हा अर्थ नाही व समाजवादी मंडळीही तो शब्द या अर्थाने वापरीत नाहीत असे मला वाटते. श्रमाच्या मोबदल्याचा अंश काढून घेणारे कोण आहेत व त्यांचा त्यामागील हेतू काय आहे हे नीट लक्षात घेऊनच त्यात पिळवणूक आहे की नाही हे ठरविणे अगत्याचे आहे हे स्पष्ट करणे हा माझा उद्देश होता. माझा लेख काळजीपूर्वक वाचणाऱ्यांच्या लक्षात हे सहज येऊ शकेल.

प्रा. जयंत राईलकर हे माझ्या लेखातील विवेचनांशी बहुतांशी सहमत दिसतात. परंतु मी केलेले विवेचन अपूर्ण आहे अशी त्यांची तक्रार आहे. त्यांचा लेख वाचल्यानंतरही ही अपूर्णता कोणत्या बाबतीत आहे हे मात्र माझ्या चांगलेसे लक्षात येऊ शकले नाही. डॉ. पटवर्धनांच्या लेखातील उणीवा दाखवून त्यातील विसंगती स्पष्ट करणे हाच माझा मुख्य हेतू असल्याने समाजवादाच्या मार्क्सपूर्व काळातील ऐतिहासिक पार्श्वभूमीच्या तपशीलात शिरण्याची आवश्यकता मला भासली नाही.

समाजनिर्मित विषमता तरी समाज दूर करू शकेल या माझ्या विधानाला पाठिंबा देताना काही प्रकारची विषमता निसर्गनिर्मित असते म्हणूनच केवळ ती इष्ट अथवा योग्य मानावी काय असा प्रश्न श्री. राईलकर उपस्थित करतात. माझ्या लेखात त्यांना भासलेली अपूर्णता कदाचित हीच असेल. परंतु मला नम्रपणे असे सुचवावयाचे आहे की माझ्या लेखातील विवेचनामधून हा प्रश्नच उपस्थित होऊ शकत नाही. विषमता दूर करणे हा समाजवादी आदर्श मृगजलवत् आहे हे डॉ. पटवर्धनांचे मत खोडून काढण्याच्या संदर्भात मी ते विधान केलेले आहे. म्हणजेच माझ्या नजरेसमोर विषमतेच्या योग्यायोग्यतेचा अथवा इष्टानिष्टतेचा प्रश्न नसून ती नष्ट करण्याच्या प्रयत्नातील यशाच्या शक्याशक्यतेचा प्रश्न होता हे उघड आहे. विषमतेची अनिष्टता निश्चयाने मानल्याखेरीज ती दूर करण्याचा प्रश्न उत्पन्नच होऊ शकत नाही हे थोडफार विचाराअंती कोणाच्याही लक्षात येऊ शकेल. विषमता अनिष्ट आहे हे नक्की ठरल्यानंतरही तिचा समूळ उच्छेद करण्याची आत्यंतिक समाजवादी भाषा बोलणे म्हणजे वस्तुस्थितीकडे पाठ फिरविणे होय हा मुद्दा मला स्पष्ट करायचा होता. निसर्गनिर्मित विषमतेची धार काही प्रमाणात बोथट करणे शक्य आहे. हे स्पष्टपणे मान्य करून नंतर मूलतः ती अपरिवर्तनीय होय असे निःसंदिग्ध विधान मी केलेले आहे. याच्याही पुढे जाऊन मी असे म्हटले आहे की जन्मतःच गुणांच्या बाबतीत विषमता नष्ट करण्याची गुरुकिल्ली जोपर्यंत मनुष्याला उपलब्ध झालेली नाही तोपर्यंत ह्या विषमतेचे अपरिहार्य अस्तित्व लक्षात घेऊनच





अनुक्रमणिका






त्याने आपली ध्येयधोरणे आखणे व ती साध्य करण्याचे मार्ग निश्चित करणे शहाणपणाचे होईल. प्रा. राईलकर जर 'मानवी स्वभाव व समाजवाद' या शीर्षकाखालील स्वतःचे विवेचन पुन्हा शांतपणे वाचतील तर त्यांना असेच आढळून येण्याचा संभव आहे की ते प्रत्यक्षाप्रत्यक्षपणे माझ्याच विचारांचा पाठपुरावा करीत आहेत.

विषमतेच्या संदर्भात डॉ. पटवर्धनांच्या पत्रातील एका विलक्षण विधानाचा उल्लेख मुद्दाम केला पाहिजे. ते म्हणतात की निसर्गनिर्मित विषमता मूलतः अपरिवर्तनीय होय ही माझी कबुली महत्त्वाची आहे. या विधानाचा ग्रंथ लावणे मला तरी कठीण आहे. एकादी गोष्ट मान्य करण्यात खळखळ करणाऱ्या माणसाला निरनिराळ्या रीतीने छडण्यात आले तर स्वतःच्या चुकीची तो कबुली देतो अशा अर्थाने हा कबुली शब्द साधारणपणे वापरण्यात येतो. पण मी माझ्या लेखात अशी खळखळ केलीच नाही अथवा त्यापूर्वीही कधी केल्याचे मला आठवत नाही. 'समाजवादी', 'समतावादी' इत्यादी विभूषणांची बिरुदावली ज्यांच्या नांवापुढे लावली जाते अशा महाभागांच्या यादीत कोठेही माझा समावेश नाही. 'समतेचा उद्‌घोषक' म्हणूनही माझ्या नावाचा जयजयकार कधी झाला नाही. व मी कोणत्याही अशा पक्षाचा कार्यकर्ता नसल्याने भविष्य काळी होण्याचाही संभव नाही. डॉ. पटवर्धनांच्या लेखाचा वैज्ञानिक दृष्टिकोनातून विचार करता काय आढळून येते ते फक्त एक जिज्ञासू व अभ्यासू म्हणून मी मांडले आहे. अशा स्थितीत मी कबुली दिली हा स्वतःचा एक मोठा विजयच आहे असे मानण्यास डॉ. पटवर्धनांनी प्रवृत्त व्हावे याला काय म्हणावे ? कदाचित हे विधान करताना डॉ. पटवर्धनांच्या डोळ्यासमोरील माझा लेख अदृश्य होऊन त्याजागी अजाणता मुंबईतील चौपाटी अथवा पुण्यातील शनिवारवाडा येथील पटांगणात वेळी अवेळी भरणाऱ्या सभांमधून ऐकू येणारे वीरश्रीयुक्त उद्‌घोष राहिले असावेत. तात्पर्य असे की मुख्य प्रश्न मी कबुली दिली काय हा नसून वस्तुस्थिती काय आहे हा आहे व त्या बाबतीतील माझे मत मी मांडलेले आहे. यात कोणालाही हर्ष वा खेद वाटण्याचा काहीही संबंध नाही.

— र. चिं. बडवे

( ३ )

श्री. संपादक 'नवभारत' यासी

स. न. वि. वि.

नवभारतच्या जुलै महिन्यातील माझा लेख "समाजवादाचे मृगजळ व भारत" यातील माझे निष्कर्ष असमाधानकारक व मान्य होण्यास कठीण वाटलेने व त्यास डॉ. बडवे यांनी दिलेले उत्तर अपूर्ण वाटलेने प्रा. जयंत राईलकर यांनी "समाजवादाचा फेरविचार" नवभारतच्या नोव्हेंबरचे अंकात केलेला आहे. त्यात समाजवादाचा ध्येयवाद हा चर्चेचा विषय होऊ शकत नाही असे ते म्हणतात व त्याचा शास्त्रीय दृष्ट्या बुद्धिप्रामाण्याचा कसोटीवर विचार केला पाहिजे असे विधान करतात. यावरून माझ्या लेखाच्या शास्त्रीय बैठकीवर विचार करून त्यातील विसंगती दाखवण्यास ते उद्युक्त झाले आहेत असे वाटते. पण नंतरच्या सर्व लिखाणात समाजवादाच्या ध्येयवादावरच त्यानी भर दिलेला असून शास्त्रीय बैठकीच्या विवेचनाचा मात्र संपूर्ण अभाव आहे. यावरून व्यर्थ शब्दावडंबर माजवून फड जिंकण्याचा त्यांचा विचार दिसतो.

तसेच लेखाचे शेवटी कल्याणकारी अर्थव्यवस्थेचा निश्चित सिद्धांत नाही असे ते सुचवितात यावरून कल्याणकारी राज्याबद्दल त्यांचे अज्ञानच प्रकट होते. सर विलियम वीव्हरीज यानी सन १९४५ साली "Full Employment in a Free Society" हा ग्रंथ लिहिला व त्यानंतर "वीव्हरीज प्लॅन" नामक कल्याणकारी राज्याची तत्त्वज्ञानाची बैठकही लगेच तयार केली. त्यावरच हल्लीचे इंग्लंड, स्वीडन आदी युरोपीय राष्ट्रात प्रस्थापित झालेली कल्याणकारी राज्ये आधारलेली आहेत. तेव्हा कल्याणकारी अर्थव्यवस्थेचा निश्चित सिद्धांत नाही हे त्यांचे विधान वस्तुस्थितीस धरून नाही.

लेनिनच्या मताप्रमाणे मार्क्सवादाची शास्त्रीय बैठक तीन मुख्य तत्त्वावर आधारलेली आहे. ती म्हणजे : (१) आधिभौतिक विरोधविकासवाद (Dialectic Materialism) (२) संपत्ती उत्पादनाचा मूलसिद्धांत ( Theory of Surplus Value (३) वर्गकलह ( Class Struggle )








त्यातील संपत्ती उत्पादनाचा मूलसिद्धांत व वर्गकलह यातील अशास्त्रीयपणा व विसंगती ही माझा लेखात शास्त्रीय बैठकीवरूनच दाखविलेली आहेत. ती असमाधानकारक का आहेत हे प्रा. जयंत राईलकर यांना शास्त्रीय प्रमाणे देऊन सहज सिद्ध करता आले असते पण ते त्यांना जमलेले दिसत नाही.

भांडवलशाही व मार्क्सवाद या उभयतानी-प्रतिपादिलेला आधिभौतिकवाद यात जीव हा जडा-पासून उत्पन्न झालेला आहे असे ठरविले आहे. तसेच विरोधविकासवादात संख्येचे गुणात रूपांतर होते असे एक तत्त्व आहे. ही दोन्ही तत्त्वे पदार्थविज्ञान-शास्त्रात मान्यता पावलेल्या ' Law of conservation या सिद्धांताप्रमाणे अशास्त्रीय ठरतात. कारण व कार्य यातील घटक एक असले पाहिजेत असे या सिद्धांताने ठरविलेले आहे. जडात प्रथमपासून जीव सूक्ष्म अवस्थेत असल्याशिवाय तसेच संख्येत गुण सूप्तावस्थेत असल्याशिवाय ते कार्यात एकदम उत्पन्न होतात हे विधान Law of conservation च्या विरुद्ध आहे. अतएव अशास्त्रीय आहे. यावरून समाजवाद ज्या मूलभूत तीन शास्त्रीय तत्त्वावर आधारलेला आहे ती तीन्ही तत्त्वे अशास्त्रीय आहेत म्हणूनच त्यावरून मी काढलेला निष्कर्ष " वर्गविरहित समाजरचना " अशक्य आहे हा बरोबर आहे. आज जगात 'वर्गविरहित समाज-रचना कोठही अस्तित्वात नाही हा पुरावा या वैचारिक बैठकीस संपूर्ण पाठिंबाच देतो.

भारतास पूर्ण वास्तववादी व्हावयाचे असेल तर त्याने आपले ध्येय समाजवादाचे ' वर्गविरहित समाज-रचना " हे न ठरविता हल्ली युरोपीय राष्ट्रात प्रत्यक्षात असलेले " कल्याणकारी राज्य " हेच ठरविणे जरूर आहे. कारण त्यात व्यक्तिस्वातंत्र्य व समाजवादातील वास्तववादी तत्त्वे– सार्वत्रिक कामधंदा, सार्वत्रिक आरोग्यरक्षण व्यवस्था, बेकारी निवारण, विमा-योजना इत्यादिकांचा त्यात समन्वय आहे. समाज-वादात व्यक्तिस्वातंत्र्याला बिलकूल वाव नाही व ही घटना समाजशास्त्राच्या दृष्टीने अत्यंत भयावह आहे. समाज सुधारणेचा शेवटचा टप्पा हा, प्रा जयंत राईलकर म्हणतात त्याप्रमाणे, समाजवाद नसून व्यक्तिस्वातंत्र्य व समाजवाद यांचा संपूर्ण समन्वय हा आहे. तो कल्याणकारी राज्याने गाठलेला नाही पण त्या मार्गाने वाटचाल झाल्यासच तो गाठणे शक्य आहे. फक्त समाजवादाने नाही.

नुकतीच रशियन पंतप्रधान कोसिजीन यांनी लीबरमान या प्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञाच्या ' नफा ' या संस्थेवर आधारलेली अर्थव्यवस्था रशियन समाजा-करिता प्रसिद्ध केली आहे. त्यावरून मार्क्ससमाजवादी उगमस्थानातच कल्याणकारी राज्य येण्याची चिन्हे दिसत आहेत. ' नफा ' म्हणजे मजूरांची पिळवणूक हा मार्क्सचा सिद्धांत आहे व त्यास ' वर्गविरहित समाजरचनेत ' बिलकूल वाव नाही. असे असूनसुद्धा सन १९१७ ते १९६५ या अठ्ठेचाळीस वर्षाचा दीर्घ अनुभव घेऊन तेथील राज्ययंत्रणा नफ्यावर आधारलेली अर्थव्यवस्था प्रस्थापित करण्याचा निर्णय घेते याचा अर्थच रशियन राज्यकर्त्यांनासुद्धा " वर्गविरहित समाजरचना " प्रस्थापित करणे अशक्य वाटू लागले आहे असा निष्कर्ष काढण्याशिवाय गत्यंतर नाही. शिवाय असा समाज प्रस्थापित करणे अशक्य आहे हे मी माझ्या लेखात शास्त्रीय बैठकीवरूनच दाखविलेले आहे. ती माझी विधाने खोडून काढणे डॉ. बडवे, प्रा. राईलकर किंवा इतर समाजवादी विद्वानांना शक्य झालेले नाही. तसेच समाजवादी "वर्गविरहित समाज-रचना " रशिया, चीन आदी कम्युनिस्टिक राष्ट्रांना अगर भारतातील सर्वोदयवाद्यांनाही अद्यापि प्रस्थापित करता आलेली नाही. या सर्वावरून 'वर्गविरहित समाज-रचना' अशक्य आहे याच निष्कर्षाप्रत येण्या-शिवाय गत्यंतर नाही. तरी भारताने वास्तववादी व्हावयाचे असल्यास व्यक्तिस्वातंत्र्य व समाजवादातील वास्तव भागाचा समन्वय करणेस ' कल्याणकारी राज्य " हेच आपले ध्येय ठेवणे जरूर आहे. व्यक्ति-स्वातंत्र्याचा अभाव असलेला समाजवाद नको.

**– मो. त्रि. पटवर्धन**
**पुणे – २.**

( ४ )

**प्रा. फाटक व शेजवलकरांचे शिवचरित्र**

संपादक ' नवभारत,' यांस,

प्रा. न. र. फाटक यांनी नवभारत मासिकाच्या जून






व जुलै महिन्याच्या अंकात कै. प्रा. शेजवलकर यांच्या शिवचरित्रग्रंथावर दोन परीक्षणात्मक लेख लिहिले आहेत. ते वाचून फारच खेद झाला. परीक्षण कसे नसावे याची दोन नमुनेदार उदाहरणे सर्वांच्या डोळ्या-समोर ठेवून फाटकानी टीकासाहित्याची आपल्या 'विरोधी भक्ती'ने अमोल सेवा केली आहे !! शे.च्या बऱ्याच विधानांचा कुत्सितपणे अर्थ लावून घेतलेल्या त्यातील आक्षेपांना वैचारिक पातळीवरून उत्तर कसे देणार ? झोपी गेलेल्याला जागे करता येते, पण....!!!

" मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम व सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल " हे आपले ब्रीदवाक्य छापलेल्या पृष्ठा-पुढेच 'नवभारता'ने प्रा. फाटकांचा लेख छापला आहे ! फाटकांच्या संयमाचा व सहिष्णुतेचा पुढील नमुना पाहण्यासारखा आहे– " जदुनाथांना मद्रासच्या पावसाळ्याचे दिवस माहीत नसले तरी त्यांचे शिवचरित्र आजतागायत सहा वेळा प्रसिद्ध झाले. शे.च्या एकाही पुस्तकाला हे भाग्य लाभणार नाही. त्यांच्या संकल्पित शिवचरित्राचा भार मराठा मंदिराचे प्रकाशन म्हणून कदाचित् राज्यकारभारात खपला तरी ते दुसरी आवृत्ति पाहील ही दुराशा सफळ होण्याचा योग संभाव्य कोटी-तला नाही. " एवढ्यानेही समाधान न होऊन ते आणखीच घसरले आहेत– " मोक्षसाधनाला कीर्तीचे वावडे होते असा पुरावा एकंदर मोक्षशास्त्रात किंवा रामदासांच्या उपदेशामध्ये आढळत नाही तोवर शेजवल-करी कीर्तिमीमांसा हा त्यांच्या बुद्धीस जडलेल्या अनेक भ्रमांपैकी एक भ्रमाचा बुडबुडा समजल्याखेरीज गत्यंतर नाही. शे० मात्र कीर्तीच्या हव्यासाने कालांतरी नामशेष होऊन राहतील. " फाटकांना शे० ची मौलि-कता 'दासोपंताच्या कापडा'एवढी दिसते ! शे० च्या स्नेह्यांनाही त्यांनी स्वतःच्या लेखणीच्या कुत्सित फटकाऱ्यातून वगळलेले नाही. फाटकांना मूल्यमापन करावयाचे ते शिवचरित्रग्रंथाचे की शे० चे आणि त्यांच्या स्नेह्यांचे ? शे० चे विचार व सिद्धांत चुकीचे आहेत किंवा ते खरे इतिहासकार नव्हेत असे त्यांना प्रामाणिकपणे वाटत असल्यास त्यात आक्षेपार्ह काही नाही. परंतु ती समजूत वैचारिक भूमिकेवरून निर्माण न होता वर दाखविल्याप्रमाणे व्यक्तिविषयक द्वेषातून दृढ होणे निश्चितच आक्षेपार्ह आहे.

फाटक म्हणतात की मराठा मंदिराने शे० करिता साठ हजाराएवढी मोठी रक्कम खर्ची घातली तरी त्यांचे कार्य अपुरेच राहिले. वास्तविक पाहता ग्रंथावर झालेल्या खर्चाचा ग्रंथपरीक्षणाशी संबंधच काय ? तो म. मं. चा खाजगी प्रश्न आहे. मं. ने साठ हजाराएवढी मोठी रक्कम शे. च्या हवाली केली होती हा फाटकांच्या विधानाचा अर्थ निघतो तो शे. संबंधी गैरसमज पसरविणारा आहे. शे. नी अगाऊ रक्कम एक पैदेखील घेतली नव्हती. मं. चे काम स्वीकारल्यापासून म्हणजे एप्रिल १९५९ पासून ते ऑक्टोबर १९६१ पर्यंत दरमहा अडीचशे रुपये त्यांनी स्वतःसाठी वेतन घेतले. १९६१ च्या नोव्हेंबरात त्यांची प्रकृति जास्त खालावली. तेव्हा आपल्या हातून शिव-चरित्राचे कार्य पुरे होईल न होईल असे वाटून त्यांनी नोव्हेंबर १९६१ पासून आपली अखेर होईपर्यंतचा (नोव्हेंबर १९६३ पर्यंतचा) पगार मुळीच घेतला नाही. आपल्या मदतनिसांचा, म्हणजे माझा व स्वतःच्या पुतण्याचा पगार (अनुक्रमे रु. १५० व १००) त्यांनी शेवटपर्यंत चालू ठेवला होता. शे. च्या कुटुंबियांनीही शे. च्या बाकी राहिलेल्या पगारांतील एक पैदेखील मं. कडून घेतलेली नाही.

फाटकांनी शे. ची अनेक विधाने विकृत स्वरूपात मांडून आपली सत्यनिष्ठा पुरेपूर व्यक्त केली आहे !! त्या सर्व विधानांचा परामर्श घ्यावयाचा तर एक ग्रंथच लिहावा लागेल. म्हणून त्यांच्या सत्यनिष्ठेची तीनचार मासलेवाईक उदाहरणे दिली म्हणजे पुरे.

" शिवाजी नेहमी घोड्यावर बसून दूरवर जाई ही समजूत सदासर्वदा खरी नाही. " " शिवाजी घोड्या-वर बसून युद्ध करी व विश्रांतीसाठी मेणा वापरी " इत्यादि विधानांचा फाटकांनी घेतलेला वाच्यार्थ नुसता विकृतच नव्हे तर पोरकट आहे. शे. ची ही विधाने करण्यामागील भूमिका श्री. टिकेकर यांच्या परीक्षण लेखाला उत्तर देताना मी स्पष्ट केलीच आहे. तिची पुनरुक्ति नको.

शे. चे दुसरे विधान " पानिपतावरील मराठ्यांची हबेलंडी काही अंशी हत्तीमुळे उडाली " असे आहे. त्याचा अर्थ स्पष्ट आहे. विश्वासराव हत्तीवरील अंबारीत बसून लढत असल्यामुळे, गिलच्यांनी हा



अनुक्रमणिका






मराठ्यांचा कोणीतरी मोठा सरदार आहे हे ओळखून त्यास अचूक टिपून बंदुकीच्या गोळीने मारले. मराठे विजयी होणार व अब्दाली पळ काढणार असा तो मोलाचा क्षण होता. पण ऐनवेळी विश्वासराव पडल्याने भाऊसाहेबांचा व इतर मराठे सरदारांचा अवसानघात होऊन युद्धाला मराठ्यांच्या पराभवाची कलाटणी एकदम मिळाली. मध्ययुगीन काळात व अर्वाचीन काळाच्या सुरवातीस मुख्य सेनापतीवरच सर्व सैन्याची मदार व त्याचे नीतिधैर्य ( Morale ) अवलंबून असत. हे माहीत असूनही विश्वासरावांनी हत्तीवर बसून लढण्यात व शत्रूचे लक्ष स्वतःकडे वेधून घेण्यात चूक केली, अशी शे. ची टीका आहे. पण तिचा विपर्यास करून " हत्तीने जागा सोडून धाव आरंभल्याचा जोवर पुरावा नाही तोवर 'हत्तीमुळेच हवेलंडी' हा कार्यकारणभाव सपशेल खोटा " असे उत्तर फाटकांनी दिले आहे.

जिजाबाईच्या सोंगट्याच्या खेळाचे वर्णन करताना तर फाटकांनी कुत्सित अर्थ काढण्याची कमाल केली आहे. शिवकालीन समरसतेचे एक उदाहरण म्हणून पुरंदरे दफ्तर भाग ३, पृ. १४० वरील या सोंगट्याच्या खेळाचा शे. नी उल्लेख केला आहे. या समरसतेमुळे महाराच्या सेवकातून त्यांच्या जीवास जीव देणारे मुत्सद्दी व सेनापति निर्माण झाले हे शे. ना दाखवावयाचे आहे. पण या सोंगट्याच्या खेळातून मुत्सद्दी व सेनापति निर्माण झाले असा वकिली अर्थ लावून फाटकांनी जो पोरकटपणा पुनः एकदा दाखविला आहे त्याबद्दल त्यांची पाठ थोपटली पाहिजे !!

प्रस्तावनेच्या पृ. ९६ वरील शे. च्या विवेचनाला उद्देशून फाटक म्हणतात, "कविकृत (परमानंदपुत्राने केलेल्या शिवनिंदेतून, शिस्त, काटकसर व शैथिल्याचा अभाव हा बोध कसा निघू शकतो हे वाचकांनीच ठरवावे." वाचकांनी पृ. ९६ वरील शे. चे सर्व विवेचन वाचावे (येथे ते देणे अशक्य आहे.) म्हणजे त्यांच्या लक्षात येईल की फाटकांनी मागचा सर्व संदर्भ गाळला असून दोनच वाक्ये तेवढी उचलून त्यांच्या कार्यकारणसंबंधाबाबतचा संशय ते व्यक्त करीत आहेत!

"महाराजांनी आरमारातून पुनः दुसरी स्वारी न केल्यामुळे मराठ्यात सागरी प्रवासाची आवड निर्माण होणे मागे पडले" या शे. च्या वाक्याचा अर्थही फाटकांनी चुकीचा लावला आहे. शे. चे म्हणणे स्पष्ट आहे. महाराजांनी जरी मराठ्यांच्या आरमाराचा पाया घातला असला तरी मराठे इंग्रज किंवा जपान्यांप्रमाणे खऱ्या अर्थाने कधीच दर्यावर्दी झाले नाहीत. सबंध मराठेशाहीत पायदळात व घोडदळात पराक्रम गाजविणाऱ्या सरदारांची असंख्य नांवे देता येतील. पण नाविकदलाकडे पाहिल्यास हाताच्या बोटावर मोजण्याइतकीच मराठे व ब्राह्मण घराणी आढळतील. महाराजांना नाविकदलाचे महत्त्व पूर्णपणे कळले होते. पण त्यांच्यासमोर दोनच पर्याय होते– आपले मर्यादित द्रव्य व मनुष्यसामर्थ्य आरमारावर तरी खर्च करणे किंवा पायदळावर व घोडदळावर खर्च करणे. महाराजांनी इंग्रज व पोर्तुगीज वगैरेंपेक्षा मोगल व विजापूरकर हे आपले बलवान शत्रू मानले. त्याचप्रमाणे आपल्या आरमाराच्या बाल्यावस्थेतच आपण जर परकीयांच्या वरचढ आरमाराशी झुंज घेतली तर कदाचित् आपल्या प्राणावर बेतेल किंवा आपण कैद होऊ व तसे झाल्यास स्वराज्यस्थापनेचा आपला प्रयत्न मुळातच खुरडला जाईल असा त्यांनी विचार केला. म्हणून त्यांनी आपल्या द्रव्यबळाचा व मनुष्यबळाचा वापर आरमारापेक्षा सैन्य, किल्ले इत्यादीवर जास्त प्रमाणात केला. यास उद्देशून शे० नी "यात महाराजांचा दूरदर्शीपणा व सावधगिरी दिसून येतात" असे म्हटले आहे. दुसऱ्या बाजूने पाहिल्यास दिसून येईल की, महाराजांना वैयक्तिक लक्ष आरमाराकडे पुरवून आपले सर्व सामर्थ्य त्यावरच एकवटता आले असते, त्यांनी स्वतः काही आरमारी स्वाऱ्या केल्या असत्या तर त्यांच्या प्रत्यक्ष उदाहरणामुळे भोसल्यांच्या राजघराण्यात व मराठे सरदारात सैनिकी परंपरेप्रमाणे आरमारी परंपराही निर्माण होण्याचा संभव होता. तसे झाले असते तर पाश्चात्य नौदलाची नावनिशाणीदेखील पश्चिम किनाऱ्यावर उरली नसती. परंतु अवरंगजेब व विजापुरकर यांची टांगती तलवार सदैव डोक्यावर असल्याने अशी नाविक परंपरा निर्माण करणे महाराजास इच्छा असूनही शक्य झाले नाही. हे दाखविण्यासाठी शे० नी "महाराजांनी आरमारांतून पुनः दुसरी स्वारी न केल्यामुळे मराठ्यांत सागरी प्रवासाची आवड निर्माण होणे मागे पडले" असे विधान केले. शे० च्या दोन्ही








विधानात फाटकांना विसंगति आढळली याचे कारण त्यांनी त्याचा लावलेला चुकीचा अर्थ. जपानी व इंग्रज लोकात दर्यावर्दीपणा येण्यास त्यांच्या राजांनी आरमाराने प्रवास केला होता काय, असा फाटकांचा प्रश्न आहे. त्यांनी इंग्रज व जपानी बादशहांकडे न पाहता पीटर द ग्रेट या रशियन बादशहाकडे पहावे. स्वतः आरमारातून प्रवास केला म्हणूनच रशियन नाविकदल भक्कम पायावर उभे राहिले व सेंट पीटर्सबर्ग ही त्याची राजधानी 'युरोपकडे जलमार्गाने उघडणारी खिडकी' बनली !

शे.च्या शिवचरित्रात नवीन काही नाही हे आपले ध्रुपद पुनःपुन: घोळताना फाटकांनी शे.च्या अपूर्ण प्रस्तावनेवरच टीका करून ग्रंथाच्या बाकीच्या भागाकडे पूर्णपणे दुर्लक्ष केले आहे. तरी बरे, शे.नी रामदासांच्या उपदेशाचा अर्थ लावण्याच्या बाबतीत स्वतःच्या मनसोक्ताची भर टाकली आहे ही गोष्ट तेच कबूल करतात ! शे.नी अनुपुराणाचे परीक्षण करून संभाजी–कलश संबंधाबाबत मांडलेले विचार नवीन नाहीत काय ? शिवाजी-संभाजी संबंधाबाबतचे त्यांचे विचारही निःसंशय नवीन, स्वतंत्रपणे प्रतिपादिलेले व इतिहासज्ञांना विचार करावयास लावणारे आहेत. तीच गोष्ट शे.नी कै. शां. वि. आवळसकर यांच्या पत्राद्वारे कर्नाटकाच्या स्वारीबाबत केलेल्या विवेचनाची. शे.नी मांडलेले विचार ग्राह्य आहेत की नाहीत हे इतिहासज्ञ ठरवतील. पण ते स्वतंत्र व शोजवलकरी छापाचे आहेत हे मात्र खात्रीने म्हणावे लागेल. "शे.नी कै. म. गो. रानड्यांचे ऋण मान्य केले नाही" ही टीका शिवचरित्रग्रंथ पूर्ण झाल्यावर करणे युक्त ठरले असते. शिवकालीन साधनांची चिकित्सा करताना शे. नी डफ, रानडे, सरकार, सरदेसाई यांच्या कार्याचा ऊहापोह नक्कीच केला असता.

वरील पाचसहा उदाहरणे, विधानांचा अर्थ विकृत स्वरूपात मांडण्याची फाटकांची हातोटी दाखविण्यास पुरेशी आहेत. असे असले तरी त्यांच्या टीकेत थोडासा विधायक भागही आलेला आहे. त्यांचे काही मुद्दे विचारांना पटणारेही आहेत. परंतु त्यांचे बहुतेक आक्षेप टीकाशास्त्राचे मूलभूत नीतिनियम व दर्जा ( Dignity ) याना धाब्यावर बसवून घेतले गेले असल्याने या विचारसूर्यास खग्रास ग्रहण लागले आहे. फाटकांच्या आक्षेपाना स्वतंत्र लेख लिहून उत्तर देणे म्हणजे कोळशाला हिरा समजून पैलू पाडण्यासारखे आहे. त्यांच्यासारख्या विद्वान् व व्यासंगी गृहस्थानी अशा तऱ्हेचे लिखाण करावे व 'नवभारता'सारख्या सदभिरुचिसंपन्न साहित्याला वाहिलेल्या मासिकाने ते छापावे याचेच वाईट वाटते.

-- मा. रा. कंटक

---










## 'एकमेका साहाय्य' करणारी आपली ज्ञानेंद्रिये

"चष्म्याशिवाय मला नीट ऐकूच येत नाही!"

द्वंद्वयुद्ध खेळणारे वीर संकेतस्थानी नेहमी काळा पोषाख घालून जात. त्याच मापाचे दुसऱ्या रंगाचे कपडे घालण्यापेक्षा काळ्या रंगाचे घातल्यास ते लहानसर दिसत व त्यामुळे त्यांच्यावर अचूक वार करणे जड जाई. डोळ्यांच्या मानसिक-शारीरिक गुणधर्मांचा द्वंद्वयुद्धात पुरेपूर उपयोग करून घेतला असता तर प्राचीन काळातील द्वंद्वयोद्ध्याला आधुनिक शास्त्रांची खूपच मदत झाली असती.

तुम्हाला जर खरोखरच लहानसर दिसायची अिच्छा असेल तर काळा रंग वापरू नका. काळ्या-तांबड्या रंगाचे कपडे वापरा.

लाल रंगाचा चष्मा घातल्यास माणूस एका अंगाकडून दुसऱ्या अंगाकडे असे झोके घेत चालतो. काही अद्भुत प्रयोग पाहू या. एका सर्वसामान्य चित्रपटगृहातील पडद्यावर एक स्थिर वर्तुळ आहे ते अजिबात हलत नाही. परंतु एखादा निनादत राहणारा आवाज सुरू करा; हजारो प्रेक्षक शपथपूर्वक सांगतील की ते वर्तुळ आकुंचन व प्रसरण पावत आहे. काळ्या पार्श्वभूमीवरील नारिंगी लाल रेषा पाहत असताना जर त्याच्या जोडीला संगीत सुरू झाले तर ती रेषा लांब लांब होत आहे असे दिसू लागते.

सकृद्दर्शनी वाटते तितके, 'चष्म्याशिवाय मला नीट ऐकूच येत नाही' हे विधान वेडगळपणाचे नाही. हिरव्या प्रकाशात श्रवणशक्ती अधिक तीव्र होते. गाण्यातील बारिकसासुद्धा स्वर टिपला जावा म्हणून गायनप्रेमी लोकांना हिरवे चष्मे घालणे कदाचित रास्त ठरेल. कोणी सांगावे, अशीही एक वेळ येईल की त्यावेळी शिल्पशास्त्रज्ञांना अिशारा द्यावा लागेल की चित्रपटगृहाला कधीही लाल आणि नारिंगी रंग देऊ नका.

मोठ्या आवाजाने डोळ्यांची निळ्या आणि हिरव्या रंगाच्या बाबतीतील संवेदनक्षमता वाढते तर लाल आणि नारिंगी रंगाच्या बाबतीतील संवेदनक्षमता कमी होते.

दृष्टी आणि श्रवण यांचाच तेवढा निकट संबंध आहे असे नाही. संधिप्रकाशात दृष्टी अधिक तीक्ष्ण करण्यासाठी काहीतरी आंबट-गोड चोखावे असे शरीरशास्त्रज्ञ सांगतात. त्यासाठी गेल्या महायुद्धात लिंबू-साखरेचा उपयोग केला जाई. पोटात ग्लूकोज किंवा साखर घेतल्याने नजर चांगली होते.

आपण अंधेऱ्या खोलीतून एकदम बाहेर उजेडात आलो, की प्रथम आपल्याला काही दिसू शकत नाही, कारण डोळे दिपतात. थोड्याच वेळाने सर्व व्यवस्थित दिसू लागते. काळजीपूर्वक केलेल्या गणिताने असे सिद्ध केले आहे की, अंधाराचा सराव होण्यासाठी डोळ्यांना सहा ते सात मिनिटे लागतात, आणि त्यांची कमाल संवेदनक्षमता गाठायला चाळीस ते पंचेचाळीस मिनिटे लागतात.

डोळ्यांची संवेदनक्षमता वाढविणे सहज शक्य आहे. अंधारात प्रवेश करण्याअगोदर अितर ज्ञानेंद्रिये प्रभावित करून डोळ्यांची संवेदनक्षमता वाढविता येईल. व्यायामानेही ती गोष्ट साध्य करता येईल. थोडा वेळ डोळ्यांच्या स्नायूंची हालचाल केल्यास कमाल संवेदनक्षमता पाच सहा मिनिटातच गाठता येते. स्नायूंच्या हालचालींच्या जोडीस दीर्घ श्वास घेणे व सोडणे ही क्रिया काही वेळ केल्यास त्याचा चांगला उपयोग होईल. चेहरा आणि मान गार पाण्याने पुसून काढल्यासही वरील गोष्ट साध्य करता येईल. स्नायू आणि त्वचा यातील संदेशग्रहण करणाऱ्या नसा उत्तेजित केल्यासही आपले उद्दिष्ट साध्य करता येईल.

दृष्टीला अंधाराचा चटकन सराव व्हावा इतकेच नव्हे तर दृष्टीची तीक्ष्णता पाच ते सहा पटींनी वाढावी यासाठी दुसरा एक परिणामकारक उपाय आहे. लाल काचेच्या चष्म्यातून एखाद्या झगझगीत पडद्याकडे दहा मिनिटे पहावे. या क्रियेला शरीरशास्त्रज्ञांनी 'लाल प्रकाशाने डोळे संपृक्त करणे' असे नाव दिले आहे.








## हिरवे लोणी आणि निळी उष्णता

भिंतींना नारिंगी रंग दिलेल्या खोलीत १५ अंश सेंटिग्रेड उष्णतामान असतानाही आपल्याला आरामशीर वाटेल, परंतु तोच जर खोलीचा रंग निळा असता तर आपल्याला गारठा भासला असता.

फक्त रंगात फरक करून लोणी जर हिरव्या रंगाचे केले आणि त्याचे इतर गुणधर्म तसेच कायम ठेवले तरीसुद्धा त्याची चव चांगली लागणार नाही. ज्याचे उष्णतामान जाणवत नाही अशा वजनापेक्षा, ती अधिक जड भासतात. संपूर्ण शांततेत जर एखादा बोजा वर चढविला तर तो जड भासतो पण तोच बोजा वर चढविताना जर संगीत कानावर पडत असेल किंवा लांबलचक हेल काढले जात असतील, तर तो हलका वाटतो.

जर तुमच्या हातात विजेचा अगदी सूक्ष्म, मंद असा प्रवाह खेळविला, जर तुमचे स्पर्शज्ञान उत्तेजित केले गेले, तर तुम्हाला अधिक चांगल्या रीतीने ऐकता येऊ लागेल, सर्वसामान्यपणे तुम्ही ऐकता, त्यापेक्षा सूक्ष्म आवाज तुम्हाला ऐकू येऊ लागतील. स्वच्छ उजेडात अधिक रुचिकेन्द्रे कार्यवाहीत होतात आणि अन्नाला अधिक चव येते. जर तुम्हाला खाद्यपदार्थांचा योग्य आस्वाद घ्यायचा असेल तर तुमच्या जेवणाच्या जागी भरपूर प्रकाश खेळू द्या. जे धंदेवाईक चव घेणारे असतात त्यांची रुचिकेन्द्रे अत्यंत संवेदनाक्षम असतात. चवीची परीक्षा करताना, इतर बाह्य चेतनांचा परिणाम होऊ नये म्हणून ते धंदेवाईक चव घेणारे लोक चव घेताना डोळे मिटून घेतात.

वासाचा चवीवर परिणाम होतो हे वेगळे सांगण्याची आवश्यकता नाही. पुष्कळ लोकांच्या मते चवीत निम्मा भाग वासाचाच असतो.

आता आणखी काही चमत्कार एका : 'श्रवणातीत नाद ' हे आपण आपल्या कानांनी ऐकू शकत नाही, म्हणून त्यांना तसे यथार्थ नाव दिले आहे. पण कानांनी नाही तर दुसऱ्या कशाने आपण ऐकू शकणार ? एका अर्थी कान नसतानासुद्धा ऐकता येणे शक्य आहे. एका शास्त्रज्ञाने म्हटल्याप्रमाणे 'श्रवणातीत नाद ' डोळ्यांनी ऐकता येणे शक्य आहे. प्रत्येक ज्ञानेंद्रियाची, ऐकू येण्याजोगा अगदी हळू आवाज, अगदी अस्पष्टसा प्रकाश आणि मंदसा वास यांच्याबाबतीत ग्रहण-मर्यादा ठरलेली असते.

परंतु जिथून 'श्रवणातीत नादा ' चा उगम झाला आहे. त्या स्थानाजवळ जर तुम्ही उभे राहिलात तर तुम्हाला अधिक स्पष्ट दिसू लागेल !

ज्ञानेंद्रियामध्ये हा जो एकमेळ दिसून येतो त्याचा सर्वात आश्चर्यकारक परिणाम कोणता तो आता पाहू या.

## मधुर आवाज

मधुर आवाजाने विविध ज्ञानेंद्रियात संपूर्ण सुसंवादित्व निर्माण होते एवढेच नसून आपले मन, जाणीव, अर्थवाही चेतनांचे साहचर्य या सर्वात सहकार्य उत्पन्न होते. वरील मथळ्यात वापरलेल्या दोन शब्दांच्या समूहाचा काय अर्थ होतो हे प्रत्येकाला माहीत आहे. त्यांच्या साहचर्यात आपल्याला गैर असे काही दिसत नाही. जर बोलीभाषेवर आपला विश्वास असेल तर आवाज कटु अथवा मृदु असू शकतो, वास तीक्ष्ण असतो आणि रंग बोलके, उबदार, गार असतात तर चव सूक्ष्म असू शकते. न कळत विविध ज्ञानेंद्रियांच्या चेतनांची आपण तुलना करून जातो.

परंतु एका स्त्रीच्या दृष्टीने आवाज खरोखरीच 'मधुर' आहे, तो केवळ लाक्षणिक अर्थाने नव्हे ; आणि केवळ मधुरच नव्हे तर कडू, तुरट आणि खारटही आहे. इतक्यावरच संपले नाही, एखाद्याने पियानोवर एक विशिष्ट स्वर वाजविला की तिच्या तोंडात केळ्याची चव घोळू लागते. 'एमा' नाव उच्चारण्याचा अवकाश, तिला पोळीचा चुरा खाल्ल्यासारखे वाटू लागते, तर 'आल्फ्रेड' चे नाव घेताच दुधाची आणि ब्रेडची चव तिच्या जिभेवर नाचू लागते. आता 'डेप' या शब्दाला काही अर्थ तरी आहे का ? पण तो शब्द कोणाच्या तोंडावाटे बाहेर पडला की तिला मांसपदार्थ खात असल्यासारखे वाटते. 'पीर' शब्दाने यकृताची आणि 'टोर' शब्दाने काहीतरी मधुर पदार्थाची चव तिच्या अनुभवास येऊ लागते. एखादा संगीत महोत्सव म्हणजे तिला अक्षरशः मेजवानीच वाटत असावी. पण त्याने तिची भूक भागत नाही हे मात्र खरे. कोणत्याही विषयावरील संभाषणानेही तिच्यावर असाच परिणाम होत असावा.

रुचीवर ऐकण्याचा इतका प्रभाव पडणे हे अपवादात्मकच. त्या स्त्रीच्या बाबतीत हा प्रभाव म्हणजे मज्जातंतूंच्या काही विकृतीचा परिणाम असावा असा निष्कर्ष काढण्यात आला की दृष्टी आणि श्रवण यांचाही निकट संबंध आहे. हा संबंध इतका आहे की अशा स्वरूपाच्या सर्वच घटनांना 'रंग-श्रवण' असे सर्वसामान्य नाव मिळाले आहे ; मग त्या घटनेशी कोणत्या का ज्ञानेंद्रियांचा संबंध असेना. परंतु त्याचा शास्त्रशुद्ध अर्थ म्हणजे आवाजाच्या योगाने रंगाची जाणीव होणे. अशा व्यक्तीचे प्रमाण अपवादात्मक आहे असे नाही. वय आणि स्त्री-पुरुष भेद विचारात न घेता, प्रत्येक बारामधल्या अेका व्यक्तीत अशा तऱ्हेचा कमतरता दोष दिसून येतो.

पण त्याला 'कमतरता' का म्हणायचे ? लोकांना त्यापासून 'त्रास' का व्हावा ? खरे पाहता या शब्द-प्रयोगांना इथे अर्थ नाही. 'रंग-श्रवणा' चा घरी काय किंवा दारी काय, कोणालाच उपद्रव होत नाही. प्रख्यात रशियन संगीतरचनाकार स्क्रियाबिन या 'देणगी' बद्दल कृतज्ञ होता. 'रंग-श्रवणा' च्या नेमक्या याच कल्पनेतून त्याला 'रंग-संगीता' ची कल्पना स्फुरली. 'रंग-संगीता' त संगीताला बदलणाऱ्या रंगांची जोड दिली जाते.

## खांद्याला खांदा भिडवून

'ज्ञानेंद्रियांचा एकमेकावर होणारा परिणाम' याचे संशोधन करता त्याचे अनेक व्यावहारिक उपयोग दिसून आले आहेत. यंत्रालयांना जर योग्य रंग दिले तर यंत्रांचा खडखडाट जरा सुसह होतो. गोर्कीतील एका जेवणघरात खालील प्रयोग करून पाहण्यात आला. तेथे येणारे ग्राहक नेहमी उकाडा होत असल्याची तक्रार करीत. परंतु मग फर्निचर, भिंती, खिडक्यांची तावदाने, दिव्यांची आच्छादने या सर्वांना निळा रंग दिल्यावर मग मात्र उकाडा होत असल्याची तक्रार आली नाही.

'तांत्रिक सौंदर्यशास्त्रा' चे कार्य म्हणजे उत्पादनात सौंदर्य निर्माण करणे. या शास्त्राची खोलवर चिकित्सा केल्यास, शेवटी, ज्ञानेंद्रियांचा एकमेकांच्या कार्यावर होणारा परिणाम व त्याची वैशिष्ट्ये यावरच अवलंबून रहावे लागते.

एखाद्या व्यवसायाचे शिक्षण घेत असता, त्या जागी भरपूर प्रकाश खेळणे अत्यंत महत्त्वाचे असते. पहिल्या काही आठवड्यात आणि महिन्यात अचूकता अत्यंत महत्त्वाची असते, त्या दृष्टीने भरपूर प्रकाश अगदी अपरिहार्य असतो.

शरीर शास्त्रज्ञांनी विविध व्यवसायांसाठी विविध रंगसंगती शोधून काढल्या आहेत. अपुऱ्या प्रकाशात खेळाचा सराव करणे अविवेकीपणाचे व हानिकारक आहे असा त्यांनी क्रीडाशिक्षकांना अिशारा दिला आहे. उंच उडीसाठी वापरायचा बांबू जितका झगझगीत असेल, लांब अुडीसाठी आखलेली रेषा जितकी स्पष्ट असेल तितक्या त्या उड्या जास्त उंच अगर लांब घेता येतात—निदान शिक्षणकालात तरी— असे दिसून आले आहे.

आपली ही ज्ञानेंद्रिये अशीच सहकार्याने, खांद्याला खांदा लावून, विधायक कार्य करोत अशी कोणाचीही इच्छा असणार !

— आर. पोदोल्नी

## नोकरशाही अव्यवस्थेवरील तोडगा –
## लोक-नियंत्रण

पक्षीय आणि सरकारी नियंत्रणाच्या यंत्रणेत पुनर्घटना करून तिला लोक-नियंत्रणाचे स्वरूप देण्याचा जो निर्णय अलिकडेच सोविएत युनियनमध्ये घेण्यात आला आहे, त्याबद्दल काही मंडळी घायकुतेपणाने बोटे मोडीत असली तरी, हा बदल म्हणजे केवळ 'पाटी-बदल' नव्हे, आणि अकस्मात् केलेली सुधारणा नव्हे.

सोविएत सत्तेच्या अगदी प्रारंभीच सरकारी यंत्रणेच्या कार्यावरील कामगारांच्या आणि किसानांच्या तपासणीच्या स्वरूपात नियंत्रण-यंत्रणा निर्माण करण्यात आली होती. सोविएत समाजाचा जसजसा विकास होत गेला तसतशी त्यांची कामे, पद्धति व नावे बदलत गेली. तीन वर्षांपूर्वी पक्षीय आणि सरकारी नियंत्रण समिति व तदनुसार प्रांता-प्रांतात समित्या स्थापन करण्यात आल्या. पक्षीय आणि सरकारी नियंत्रणाला पाठबळ म्हणून सार्वजनिक संघटनांनी अनेक साहाय्य-गट आणि ठाणी निर्माण केली. आर्थिक योजना पुऱ्या करण्यावर, कायदे आणि निर्णय व कायदेशीरपणाचे पालन करण्यावर नियंत्रण ठेवून परिणामी, जन-








तेच्या हितसंबंधाच रक्षण करून देशाची अर्थव्यवस्था, आणि सरकारी व आर्थिक यंत्रणेचे कामकाज सुधारण्याच्या कामी आणि सरकारी कार्यात व्यापक जन–समुदाय ओढण्याच्या कामी पक्षीय व सरकारी नियंत्रण–यंत्रणेने या तीन वर्षात काम केलेले आहे.

कामगार सघ, पक्षीय आणि इतर सार्वजनिक संघटनानी साहाय्यक-गटावर धाडलेल्या सव व्यवसायातील व सर्व राष्ट्र-जमातींच्या पक्षीय व अपक्षीय स्त्री–पुरुषांची संख्या आता ५० लाखावर गली आहे. वस्तुतः आज लोक–नियंत्रणाची व्यवस्था अस्तित्वात आहे. समाजसत्तावादी लोकशाहीचा विकास घडवून आणण्याच्या कामी इतर अनेक उपायाबरोबरच सोविएत कम्युनिस्ट पक्षाच्या कार्यक्रमात या अशाच लोकनियंत्रण व्यवस्थेकडे नेणोरं संक्रमण कल्पिलेले होते.

लोक-नियंत्रण व्यवस्थतील समित्यांच अधिकार व त्यांची कर्तव्ये कोणती असतात ? दशाची प्रगति व्हावी व लोककल्याण साधण्यासाठी अथव्यवस्थेचा विकास व्हावा म्हणून प्रतिनिधींनी केलेले कायदे अमलात येतात की नाहीत; सरकारच्या सर्व पातळयावर कायद्याच पालन होते की नाही याची पद्धतशीर तपासणी करणे, हे त्यांचे मुख्य कार्य असते. जे प्रथम करायला पाहिजे ते निश्चित करून त्याला पाठिंबा देणे, उणीवा शोधून त्या दूर करणे आणि मुख्यतः नोकरशाही, वरवर रंगसफेती आणि अव्यवस्था यांच्याविरुद्ध शेवटपर्यंत लढा देणे, हे त्यांच कार्य असते.

सध्याच्या नियंत्रण-व्यवस्थेत काहीच उणीवा नाहीत आणि ती सर्वत्र सारखीच परिणामकारक ठरेत असे म्हणणे मूर्खपणाचे आहे. हातातील कामाकडे पहाण्याचा भिन्न लोकांचा भिन्न दृष्टीकोन असतो. मग कामगारांच्या, कामगार-संघाच्या, इतर सार्वजनिक संघटनांच्या बैठकीत, खुद्द नियंत्रकाच्या परिषदांतून, वृत्तपत्रातून आणि आकाशवाणीवरही त्यातील उणीवांची चर्चा होते. अशा रीतीने नियंत्रण-व्यवस्थेला अनुभव व ज्ञान प्राप्त होते.

ज्यांचे काम तपासले जाते ते लोकही भिन्न असतात. काहीजण टीकेला खुषीने साद देतात, तर दुसरे स्वतःचे समर्थन करू पहातात, तर आणखी–पण अगदी क्वचित्–नियंत्रकांवर सूड घेण्यासाठी धडपडत रहातात. सोविअेत जनता प्रतिनिधींना पाठिंबा देते. त्याचे कार्य परिणामकारक होईल अशी दक्षता घेते. त्यासाठी सभेत अथवा वृत्तपत्रांतून मन वळविण्याचा प्रयत्न करते. न्याय मिळवून देण्यासाठी शिक्षादेखील करते.

नियंत्रणव्यवस्थेतील कार्य म्हणजे नव्याविरुद्ध जुने, पुढारलेले विरुद्ध मागासलेले यांच्यात लोककल्याणार्थ चाललेला झगडा.

कायदा मोडणाराला शासन झालेच पाहिजे अशी मागणी करण्याचा हक्क असल्याने, कायदेभंगच होणार नाही अशी दक्षता लोक–नियंत्रण समित्या प्रामुख्याने घेतात. त्याला प्रतिबंधक कार्य म्हणता येईल. कोट्यवधि लोक नियंत्रणाच्या कामात भाग घेऊ लागतील तेव्हाच हे शक्य होईल. कारण प्रत्येकजण आपल्या लहान–मोठ्या जागेवर काम करणारा माणूस प्रक्रियेच्या गाभ्यात शिरून, सामायिक हितसंबंधांच्या दृष्टिकोनातून, सबंध समाजाच्या हिताचा विचार करून मूल्यमापन करील तरच हे शक्य होईल.

लोक - नियंत्रण प्रामुख्याने आमच्या जीवनाचा जो मूलाधार आहे त्या आर्थिक जीवनाला, उद्योग–वाटपाला, सरकारी यंत्रणेच्या कार्याला आम्ही लागू करतो. भिन्न समाजव्यवस्थेत असे समग्र लोकांचे संबंध अर्थव्यवस्थेवर नियंत्रण शक्य आहे का ? लोक-नियंत्रण म्हणजे समाजसत्तावादी लोकशाहीच्या विकासाचा आणखी एक फायदा होय, असेच सोविएत जनता मानते यांत मुळीच आश्चर्य नाही.

– ( निकोलाय आनोनोव्ह–
" सो. यु. समाचार आणि विचार " वरून )






# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

| | | किंमत |
|---|---|---|
| (१) धर्मकोश– व्यवहारकाण्ड भाग १ ते ३ | | |
| | साधी बांधणी ... ... ... | ८०·०० |
| | कापडी बांधणी ... ... ... | १०४·०० |
| (२) धर्मकोश - उपनिषत्काण्ड भाग १ ते ४ | | |
| | साधी बांधणी ... ... ... | १५०·०० |
| | कापडी बांधणी ... ... ... | १८२·०० |
| (३) धर्मकोश– संस्कारकाण्ड भाग १ ला .... | | ४५·०० |
| | कापडी बांधणी ... .... ... | ५३·०० |
| (४) मीमांसादर्शन ... ... ... ... | | ३०·०० |
| (५) मीमांसाकोश ... भाग १ ते ६ | | २३०·०० |
| (६) कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश ... .... | | ६·०० |
| (७) बौद्धागमार्थसंग्रहः .... ... ... | | २०·०० |
| (८) हिंदुधर्माची समीक्षा ( लक्ष्मणशास्त्री जोशी ) ... | | ५·०० |
| (९) वैदिक संस्कृतीचा विकास ... .. ... | | ६·०० |
| (१०) नवमानवतावाद ... ... ... | | २·५० |
| (११) मानवाचा आदर्श ... ... ... ... | | ३·०० |
| (१२) चार्वाक– इतिहास आणि तत्त्वज्ञान ( प्रा. सदाशिव आठवले ) ... | | ३·०० |
| (१३) गीता-प्रवेश ( डॉ. गो. वि. देवस्थळी ) ... | | २·५० |
| (१४) महाराष्ट्रांतील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना ( श्री. चा. अ. दाभोलकर ) .... | | २·०० |



अनुक्रमणिका